शिक्षणखात्याच्या मंजुरीचा क्रमांक : पपम १०० (भाषा) ५ ड, दि. ११-२-१९७०

# बालभारती

## मराठी पुस्तक पाचवे




१९७०

महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ

पुणे

# प्रस्तावना

शासनमान्य अभ्यासक्रमानुसार पाठ्यपुस्तकांची निर्मिती व्हावी या उद्देशाने महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळाची स्थापना झालेली आहे. मंडळाने इयत्ता १ ते ७ पर्यंतच्या विविध विषयांच्या पाठ्यपुस्तकांच्या निर्मितीचा कार्यक्रम आखलेला असून सदर पाठ्यपुस्तक त्यानुसार तयार केले आहे. ते तयार करताना शिक्षक, शिक्षणशास्त्रज्ञ आणि विविध शिक्षणसंस्था यांनी पाठविलेल्या सूचनांचा काळजीपूर्वक विचार करण्यात आला असून ते अधिकाधिक निर्दोष कसे करता येईल याकडे लक्ष पुरविण्यात आले आहे.

भारत सरकारने मान्य केलेल्या व महाराष्ट्र शासनाने स्वीकारलेल्या देवनागरी लिपीतील सुधारणा व जोडाक्षरपद्धती यांचा या पुस्तकाच्या मुद्रणात अवलंब केला आहे.

संचालक,
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती
व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.

पुणे :
दि. २८ एप्रिल, १९७०
वैशाख ८, १८९२.

प्रथमावृत्ती १९७०

राईट प्रिंट पॅक, मुंबई १३ (भारत) येथे छापले.



## प्रतिज्ञा

भारत माझा देश आहे. सारे भारतीय माझे बांधव आहेत.

माझ्या देशावर माझे प्रेम आहे. माझ्या देशातल्या समृद्ध आणि विविधतेने नटलेल्या परंपरांचा मला अभिमान आहे. त्या परंपरांचा पाईक होण्याची पात्रता माझ्या अंगी यावी म्हणून मी सदैव प्रयत्न करीन.

मी माझ्या पालकांचा, गुरुजनांचा आणि वडीलधाऱ्या माणसांचा मान ठेवीन आणि प्रत्येकाशी सौजन्याने वागेन.

माझा देश आणि माझे देशबांधव यांच्याशी निष्ठा राखण्याची मी प्रतिज्ञा करीत आहे. त्यांचे कल्याण आणि त्यांची समृद्धी ह्यांतच माझे सौख्य सामावले आहे.

# अनुक्रमणिका


M. S. BUREAU OF ... PUNE
LIBRARY

कविता



# . १ .

# माझ्या भाग्यरेषा

## नानासाहेब करमरकर

कलावंतांबद्दल नेहमीच आपल्याला कुतूहल असते, होय ना? **नानासाहेब करमरकर** हे एक थोर शिल्पकार होऊन गेले. त्यांनी आपल्या बालपणच्या आठवणी इथे सांगितल्या आहेत. तुम्हांला त्यांतून स्फूर्ती घेता येते का, ते पाहा.

त्या वेळी माझे वय पाच-सहा वर्षांचे असेल. कुलाबा जिल्ह्यातील सासवणे हे आमचे गाव. माझ्या आजोबांपासून गणपती करणे हा आमच्या घराण्याचा एक जोडधंदा होता. माझे वडील व त्यांच्याबरोबर माझा वडील भाऊ हे गणपती करत असत. आमच्या गावी डोंगराची लाल माती होती. ती वस्त्रगाळ करून लोण्यासारखी मऊ करत असत. शाळेतून आलो की गणपतीच्या खोलीत जाऊन माती चिवडल्याशिवाय माझा एकही दिवस जात नसे. एकदा मी लहान बोराएवढ्या मातीचा एक लांबट गोल केला व दोन्ही हातांचे अंगठे व जवळची दोन बोटे यांमध्ये धरला व दाबला तसा त्याला सापाच्या फणीसारखा आकार आला. आपण सापाची फणी केली ही जाणीव मला झाली. साप लांब असतो म्हणून लगेच लांब वळी करून फणीला जोडली. साप वेटोळे करून फणी उभारून पाहतो आहे, हे दृश्य पाहून आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या. आपल्याला साप करता येतो हा विश्वास निर्माण झाला. इतरही अनेक प्राण्यांची चित्रे तयार करून गणपतीजवळ ठेवून दिली.

एके दिवशी वडिलांनी माझी ती चित्रे पाहिली व मला हाक मारून सांगितले, "या बाळकट्या कशाला करतोस? गणपती कर ना."

"मला येईल का?" मी विचारले.

"करून तर बघ."

"गणपतीच्या खोलीत बसून करू का?"

"बस ना, नको कोण म्हणतो?"

वडिलांनी दिलेल्या या परवानगीने मला उत्साह वाटला. मी रोज गणपती करण्याची धडपड चालू ठेवली. पहिले तीनचार दिवस मनासारखे जमेना. पण नंतर जेव्हा नीट जमू लागले तेव्हा त्यांच्या गणपतींच्या ओळीत माझेही गणपती ठेवू लागले. अप्पा आणि काका सांगू लागले, "अरे, आता तुझे गणपती चांगले आहेत. पण जरा मोठे कर. बारीक करू नकोस."

लहान लहान गणपती मला सहज करता येऊ लागले. ते वडिलांना पसंत असत. मग गणपतींना रंग देणेही सुरू झाले. शरीराचा रंग, शाल, पीतांबर, वर्ख वगैरे क्रिया माझ्या हातून होऊ लागल्या. त्याही काकांच्या पसंतीला उतरल्या. परंतु ती विशेष कारागिरी नव्हती. डोळे, भुवया व गंध रंगवणे ही मुख्य कारागिरी होती. या कारागिरीला आखणी म्हणत. काका म्हणाले, "तुला आखणी आली म्हणजे तू गणपतीवाला झालास."

मी दररोज ते आखणीचे काम मन लावून पाहात होतो. ते मी करीन म्हणायला धीर होत नसे. तीनचार दिवस मी नुसता पाहात बसलो. नंतर मी ते करू का, असे विचारण्याचा धीर केला.

वडील म्हणाले, "करून पहा,पण गणपती फुकट जाता उपयोगी नाही. लहानसा गणपती घेऊन प्रयत्न कर."

मग त्यांनी केलेला लहान गणपती पुढे घेतला व आखणीला सुरुवात केली. जणू काय परीक्षेलाच बसलो. समोर गणपती ठेवला, मांडी घालून बसलो. गणपतीच्या डोळ्यांच्या बुबुळांना व दातांना पांढरा रंग लावला. मग लहान बारीक टोकाचा ब्रश घेतला व दम धरून, ओठ आवळून, कपाळावर लाल रंगाने गंध काढले आणि मगच दम सोडला! तसेच काळ्या रंगाने डोळ्यांच्या बुबुळांखाली व वर रेघ दिली. मग भुवया काढल्या. केसांना काळा रंग दिला. मागे वळून पाहतो, तो काका पाहात होते! मी थोडा दचकलो व विचारले, "आखणी ठीक का?"

काका म्हणाले, "ठीक आहे. पण कलम सफाईनं फिरलं पाहिजे. आणि ओठ कशाला आवळतोस?"

झाले! मी पाच-सहा गणपतींची आखणी केली. ती काकांना पसंत पडली. ते म्हणाले, "तू या वर्षी माझ्याबरोबर मुंबईला चल. म्हणजे मला रंगाच्या कामाला मदत होईल."

मला फार आनंद झाला! सगळ्यांना मी आता मुंबईला जाणार म्हणून सांगत सुटलो. त्या वेळी मुंबईला जाणे म्हणजे विलायतेला जाण्यासारखे कुतूहल होते.

आता मी जवळजवळ गणपतीवाला झालो होतो. कामाला नवीन स्पेशल खोली, माझे टेबल हत्यारे स्पेशल, बसायला पातळशी गादी, छोटा तक्या हे सारे मुद्दाम माझ्यासाठी काकांनी तयार केले. मला इतका आनंद वाटे की मी तेथेच सर्व वेळ घालवी. मग माझ्याबरोबरची शेजारची मुले माझ्याभोवती जमू लागली, चेष्टाही करू लागली–"अँहँ! काय ऐट! मोठा गणपतीवाला झाला! पण तुला चित्रं कुठं करता येतात?" कोणी म्हणे, "बैल किंवा कुत्रा करून दाखव."

अशी अनेक प्रकारची चित्रे जी मी कधी केली नाहीत ती सुचवू लागली. मी सांगे, "अरे थांबा, मी चित्रं पण करीन."

अशा रीतीने मला चित्रेही करण्याचा नाद लागला.

मी बराच मोठा झालो, म्हणजे पंचा नेसू लागलो. माझ्या खोलीत खूप शांतता असे. पण मन चलबिचल होऊ लागले. कारण तेच ते गणपती करणे कंटाळवाणे वाटू लागले. आपण कागदावर माणसे काढली तर? कल्पना सुचली. आमच्या घरात पोथ्या होत्या. त्यांत रामपंचायतन, शिवपंचायतन, मारुती, शेषशायी भगवान वगैरे अनेक चित्रे होती. कागदावर त्या चित्रांसारखी चित्रे काढावी. त्यात मजा येईल. झाले. त्या पोथ्यांतले एकेक चित्र खोलीत आणून कागदावर काढू लागलो. कागद खोलीत जमू लागले.

एकदा काका खोलीत आले व म्हणाले, "काय रे, हल्ली तुझा गणपतीवरचा हात थंडावला का? आणि हे काय, या कागदाच्या वळकट्या कसल्या?"

मी म्हटले, "ती चित्रं आहेत."

ते म्हणाले, "पाहू दे."

मी दाखवली. ती पाहून ते म्हणाले, "ही चांगली आहेत. कागदावर कशाला काढतोस? आपल्या ओटीच्या भिंतीवर काढ. मी चुना लावून भिंती पांढऱ्या करून देतो. पण गणपतीही केले पाहिजेत. नाहीतर खाशील काय? याच धंद्यावर तुला जगायचं आहे हे लक्षात ठेव!" असे सांगून ते गेले. भिंतीवर चित्रे काढायला मिळणार याचा केवढा उत्साह व आनंद वाटला!

आमच्या ओटीवर गणपती, दत्तात्रय, राम, लक्ष्मण, सीता यांची चित्रे काढली. रंग गोंदात कालवून ती भडक रंगात रंगवली. वडील गवई होते. दर गुरुवारी भजन व सणाच्या दिवशी गाणे आमच्या घरी व्हायचेच. चित्रे रंगवून झाल्यावर पहिली बैठक झाली. तेव्हा मंडळी म्हणाली, "अरे वा! पांडोबा, तुमची ओटी म्हणजे पेशव्यांचा राजमहाल झाला! फार छान दिसतो. चित्रं कुणी काढली?"

काका म्हणाले, "दुसरं कोण, आमचा विन्या. आता त्यानं चित्रं काढण्याचा नाद घेतला आहे."



ग्रामस्थांनी विठोबाच्या देवळात चित्रे रेखाटण्यास मला सांगितले व मी ती रेखाटली. त्या वेळी ग्रामस्थांना माहीत नव्हते व मलाही माहीत नव्हते की देवळातल्या चित्ररेषा माझ्या भाग्यरेषा ठरणार आहेत!

काही दिवसांनी कुलाब्याचे असिस्टंट कलेक्टर रॉथ्फिल्ड आमच्या गावी आले. त्यांनी ती देवळातली चित्रे पाहिली. त्यात शिवाजीमहाराजांचेही एक चित्र होते. ते चित्र त्यांना फार आवडले. त्यांनी मला अलिबागला त्यांच्या घोडागाडीतून नेले. त्यांच्याजवळ ग्रीक शिल्पचित्रांचे फोटो होते. ते त्यांनी कौतुकाने दाखवले. ते मराठी बोलत असत. मला म्हणाले, "असे पुतळे तू करशील?"

मी म्हटले, "साहेब, मी प्रयत्न करीन. मला तुमचा एक फोटो द्या."

फोटो देऊन त्यांनी मला घरी पोचवले. दुसऱ्या दिवशी त्या फोटोवरून त्यांचा पुतळा करायला सुरुवात केली. दोन दिवसांनी तो पुरा केला. तो छोटासा अर्धपुतळा घेऊन त्यांच्याकडे गेलो.



श्री. रॉथ्फिल्ड व त्यांची पत्नी ही दोघे तो पुतळा पाहून खूष झाली. साहेब मला दहा रुपयांची नोट देऊ लागले.

मी म्हटले, "साहेब, पैसे नकोत. हा पुतळा मी माझ्या हौसेनं केला आहे."

तरीही त्यांनी ती नोट माझ्या खिशात घातली व सांगितले, "तुला मुंबईला शिकायला गेलं पाहिजे. मी व्यवस्था करणार आहे."

मला फार हर्ष झाला ! आणि मी तेथून धावत निघालो तो घरी वडलांजवळ गेलो. दहा रुपयांची नोट त्यांच्या हातात ठेवली व सांगितले "हे पाहा, त्या साहेबानं केवढ मोठं इनाम दिलं !"

वडिलांना फार आश्चर्य वाटले. माझा आनंद गगनात मावेना. त्या दहा रुपयांच्या इनामाची बातमी मी सर्व मुलांना सांगत, हौसेने उड्या मारत सुटलो. त्या दहा रुपयांचे मोल मला अगणित वाटले.

त्यानंतर पुढील आयुष्यात माझ्या शिल्पकृतींनी लक्षावधी रुपये मिळवून दिले. पण १९१० साली मिळालेले ते दहा रुपये केवळ अमोलच !

पुढे याच रॉथ्फिड साहेबांनी मुंबईतील जे. जे. स्कूल ऑफ आर्ट आणि लंडनच्या रॉयल अकादमीत माझ्या शिक्षणाची व्यवस्था केली. माझ्या देवळा-तल्या त्या चित्रांनी माझ्या विकासाची वाटही मोकळी केली. देवळातल्या त्या चित्ररेषा माझ्या भाग्यरेषाच ठरल्या !

भाग्यरेषा – उत्कर्ष दाखवणाऱ्या तळहातावरील रेषा, मोल – किंमत, अगणित – मोजता न येण्याइतके.

अभ्यास :

१. करमरकर गणपतीची आखणी करायला कसे शिकले ?
२. देवळातल्या चित्ररेषा नानासाहेबांच्या भाग्यरेषा कशा ठरल्या ?
३. १९१० साली मिळालेले दहा रुपये नानासाहेबांना अमोल का वाटतात ?
४. करमरकरांनी आपली कलेतील प्रगती कसकशी साधली ?
५. चिकणमाती भिजवा व नाग, उंदीर, गणपती आणि काही इतर चित्रे तयार करा.





## .२.

# मोती

**मधु मंगेश कर्णिक**

**मधु मंगेश कर्णिक** (जन्म : १९३३.) यांची अनेक पुस्तके प्रसिद्ध झालेली आहेत— पुढील कथा त्यांच्या 'सोबत' या पुस्तकातून घेतलेली आहे.

काही प्राण्यांचा आपल्याला इतका लळा लागतो की घरातल्या माणसांसारखे ते प्रिय होतात. पुढे दिलेल्या कथेतील 'मोती' हा असाच अगदी घरचा झाला आहे.

मोती आला आणि आमच्या काळ्या गायीला पाडी झाली. त्यापूर्वी त्या गायीला प्रत्येक वेळी गोन्हा झाला होता. त्यामुळे हा शुभशकुन आईच्या मते मोतीनेच घडवला होता. आणि वडलांना तर मोतीचा फारच लळा लागला. थोड्याच दिवसांत मोती आमच्याशी घरातील मोठी माणसे वागत तसा वागू लागला. खरे तर त्याला आम्ही पोरांनीच लहानाचा मोठा केला होता. पण ते तो विसरला होता. आमच्या लपालपीत, आबाधुबीच्या खेळात भिडू होण्याचे त्याने नाकारले. त्याची बैठक पडवीत आमच्या वडलांच्या समोर असे. वडील माच्यावर बसलेले असले, की जणू काही त्यांच्यावर संरक्षणाचा पहारा करण्यासाठी जागरूकपणे त्यांच्या पायांशी बसून राहायचा. त्यांनी 'मोत्या ऊठ', म्हटले की कान फडफडवीत उठायचा. 'मोत्या छू' म्हटले, की त्यांनी हाताने दाखवलेल्या दिशेकडे वेगूट पळायचा. कुणाचे परके ढोर परड्यात येण्याची मोतीसमोर सोय नसे आणि कुणी परका माणूस अंगणात उभा राहिलेला त्याला सहन होत नसे. वडलांनी 'मोत्या चूप' म्हटले, की तावडतोब कान पाडून तो उगी राहायचा आणि त्या माणसाला त्याच्या आज्ञाधारकपणाचा विस्मय वाटायचा. अष्टौप्रहर

मोती त्यांच्या अवतीभवती असायचा. घराबाहेर पडले, की ते कुठे जाणार हे तो बिनचूक ओळखायचा नि त्यांच्यापुढे चालत सुटायचा. ते ज्या घरी जाणार असतील त्या घरी त्यांच्या आधीच जाऊन धापा टाकत उभा राहायचा.

मोतीची घरातल्या सर्वांवर नजर असे. बाहेरून कोणी अनोळखी माणूस आला, की त्याच्या हालचालींवरही त्याचा सक्त डोळा असे. मोतीची नजर चुकवून अंगणात पडलेले फणसाचे वाळलेले पानही कुणी उचलू धजत नसे. एकदा रात्री वडील कशासाठी तरी अंगणापलीकडील मोकळ्या जागी चालले होते. मोती पाठोपाठ होताच. त्याला कसलीतरी शंका आली. तो जोरजोराने भुंकू लागला. वडलांना तो एकही पाऊल पुढे टाकू देईना. भुंकत तो अंगणापलीकडच्या फणसाच्या बुंध्यापर्यंत जाई नि पुन्हा मागे वडलांपाशी येऊन भुंके. आपल्या भाषेत काहीतरी सांगू लागे. वडलांनी त्याच्या मनातले ओळखले; घरात जाऊन त्यांनी कंदील आणला नि मोतीला घेऊन ते फणसापाशी उभे राहिले नि गोठ्यात गुरांना वैरण घालत असलेल्या गड्याला त्यांनी हाक मारली. त्याला काठी घेऊनच यायला सांगितले. गडी काठी घेऊन आला...

फणसाच्या बुंध्याशी एक भला मोठा अजगर आपले बेडकासारखे दिसणारे डोके पवित्र्यात उभारून तयार राहिला होता. कंदिलाला दिपून गेल्यामुळे त्याची हालचाल होत नव्हती. गड्याने आणि वडलांनी एकामागोमाग एक प्रहार करून त्या अजगराला ठार केले आणि मगच मोतीचा आरडाओरडा बंद झाला.

मोती शिकारीच्या कामात वाकबगार होता. वडील बंदूक खांद्यावर घेऊन बाहेर पडले म्हणजे त्यांच्यापुढे एक पाऊल त्याचे पडे. ससा निघाला म्हणजे मोतीची उडी सशापुढे एक वाव अधिक पडायची. पण हा शिकारीबाणाच एकदा त्याच्या जिवावर बेतला होता.

गावात भिकाऱ्यांचा तळ पडला नि ते लोक शिकारीला बाहेर पडले. कधी परक्या माणसाबरोबर बाहेर न जाणारा मोती त्या दिवशी नेमका त्यांच्याबरोबर रानात शिरला. मोतीने रानात गेल्यागेल्याच दोन ससे मारून दिले. शिकारीच्या खेळातील मोतीची कर्तबगारी भिकाऱ्यांच्या नजरेत भरली. त्यांनी मोतीला पळवण्याचा घाट घातला. रात्री त्याला त्यांनी त्यांच्या तळावर बांधून

ठेवले नि पहाटे गाव जागा व्हायच्या आत मोतीला बरोबर घेऊन त्यांनी तळ उठवला. मोतीला साखळी बांधून त्यांनी आपल्याबरोबर बळजबरीने नेले.

रात्री मोती घरी आला नाही तशी शोधाशोध सुरू झाली. घरातले एखादे माणूसच घरी परतू नये तसे वाटून सगळीकडे चौकशी सुरू झाली. मोतीला गावाबाहेर भिकाऱ्यांनी डांबून ठेवले असेल, ही शंकाच कुणाला आली नाही. त्या रात्री कुणी जेवले नाही. मोती कुठे गेला असेल, याची काळजी करत नि त्याच्या आठवणी काढत त्या रात्री किती वेळपर्यंत तरी आम्ही जागत बसलो होतो.



मोती दुसऱ्या दिवशी आला नाही नि तिसऱ्या दिवशीही त्याचा तपास लागेना. मोतीसाठी वडलांनी पाचदहा गावे पालथी घातली; पण शोध लागेना. शेवटी आता मोती आपणांस कायमचा अंतरला असे समजून सगळे घर दुःखी-कष्टी झाले.

यावर एकदोन नव्हे तर चांगली तीन वर्षे गेली. मोती एके दिवशी अकस्मात येऊन दाखल झाला! प्रथम त्याला कोणी ओळखलेच नाही. ओळखणार कसे? त्याचे कान छाटले होते, शेपटी छाटली होती, पाठीवर लोखंड तापवून डागल्याच्या काळ्याकुट्ट खुणा होत्या. त्याचा पूर्वीचा सारा दिमाख पार नाहीसा झाला होता. दुष्काळातून तोंड घेऊन आलेल्या एखाद्या जनावरासारखा तो हडकलेला कुत्रा आमच्या घरात ओळखीच्या माणसासारखा शिरलेला पाहून सर्वांना आश्चर्य वाटले. मोती घरात आला नि सगळीकडे

भराभर हिंडला. सगळ्यांना तो प्रेमभराने चाटू लागला; तरी कुणी त्याला ओळखू शकले नाही. तसा तो शहाणा कुत्रा दुःखीकष्टी झाला. आपल्याला या घरात कोणी ओळखले नाही, हे त्याला कळून चुकले. निरुपाय होऊन त्याच्या काळ्याभोर डोळ्यांतून आसवे ओघळू लागली. तोच वडील बाहेरून आले. त्यांना पाहताच तो आवगाने पुढे झाला नि त्यांच्या छातीवर दोन्ही पाय ठेवून तोंडातल्या तोंडात कुईकुई आवाज करू लागला. आपली भुंडी शेपटी हलवू लागला. वडलांच्या अंगाला चाटू लागला. जणू तो विचारत होता, "अरे, मला परक्यासारखं का वागवता? मला अद्याप कसं कोणी ओळखलं नाही?"

वडलांनी त्याच्याकडे नीट पाहिले नि क्षणार्धात त्याला ओळखले. त्याच्या गळ्याला मिठी मारत ते म्हणाले, "पोरांनो! अरे, हा आपला मोती!"

मोतीला मध्ये ठेवून आम्ही सर्वांनी आनंदाने त्याच्याभोवती उड्या मारल्या. आमची बहीण तर मोतीच्या गळ्याला घट्ट मिठी मारून बसली. न जाणो पुन्हा नाहीसा झाला तर—

मोती आला नि पाठोपाठ भिकारी शोध करीत आले. आमचा कुत्रा आला आहे का असे विचारू लागले. भिकाऱ्यांची चाहूल लागताच मोती घाबरला आणि माजघरातल्या कोपऱ्यात दडून बसला. तो वाघासारखा कुत्रा पण भीतीने थरथर कापू लागला. त्याची ती अवस्था वडलांनी पाहिली नि ते बाहेर उभ्या राहिलेल्या भिकाऱ्यांना म्हणाले, 'आता बऱ्या बोलानं गाव सोडता, की हवं चौदावं रत्न? माझा तरणाबांड कुत्रा पळवून त्याची दशा दशा लावलीत तुम्ही! जख्खड म्हातारा झाला माझा कुत्रा. आता त्याची आशा धरलीत तर पुन्हा घाटावरून उतरू देणार नाही, याद राखा."

वडलांची ती धिप्पाड मूर्ती आणि रागीट चेहरा बघून ते भिकारी घाबरले व निघून गेले. पण त्यांचा तळ गावातून बाहेर पडेपर्यंत मोती माजघरातून बाहेर पडत नव्हता. भिकाऱ्यांनी त्याचे अतिशय हाल केले होते आणि मोतीने त्यांची हाय खाल्ली होती.

मोती आता म्हातारा झाला होता. आता त्याच्याने पूर्वीसारखे धावणे होत नव्हते. त्याची पूर्वीची ताकद त्या तीन वर्षांच्या वनवासात नाहीशी झाली

होती. तो आपला रात्रंदिवस पडवीत बसून राही. कधी कधी लहर लागली तर वडलांबरोबर बाहेर पडे.

वडिल दरवर्षी श्रावणात हरिविजय किंवा पांडवप्रताप यासारखी पोथी रात्री वाचत. सगळे गावकरी ती ऐकायला गोळा होत. वडलांनी पोथी वाचायला सुरुवात केली, की मोती जिथे असेल तिथून धावत यायचा नि वडलांसमोर एखाद्या भाविक श्रोत्यासारखा बसून राहायचा. पोथी वाचून पूर्ण होईपर्यंत तो बसल्या जागेवरून उठत नसे; वर तोंड करून तो नुसता ऐकत राहायचा. त्याला काय समजे कुणास ठाऊक, पण त्याचे हे पोथी ऐकणे मोठे अपूर्वाईचे वाटे. गावात सगळे जण त्याची चर्चा करत.

असा होता आमचा मोती !

घाट घालणे – बेत आखणे, कट रचणे, कायमचे अंतरणे – मृत्यू पावणे, मुकणे, चौदावे रत्न दाखवणे – मार देणे, बेछूट – अनावर, हाय खाणे – भीती बाळगणे, जख्खड म्हातारा—अतिशय म्हातारा.

अभ्यास :

१. मोतीने प्रेम कसे संपादन केले ?

२. मोती घराची राखण कोणत्या प्रकारे करत असे ?

३. अंगणात अजगर असल्याचे मोतीने कसकसे लक्षात आणून दिले ?

४. वाघासारखा मोती, पण त्याने भिकाऱ्यांची धास्ती का घेतली होती ?

५. वाक्यांत उपयोग करा : लळा लागणे, तळ पडणे, गाव पालथे घालणे, हाय खाणे.

६. श्री. मधु मंगेश कर्णिक यांचे 'सोबत' हे पुस्तक वाचा.



# ३. भेट

**जयसिंग शिंदे**

**जयसिंग शिंदे** (जन्म : १९३२.) यांच्या 'शर्यत' या कथासंग्रहातून 'भेट' ही कथा घेतली आहे. गेली काही वर्षे ते पत्रकार म्हणून काम करत आहेत. त्यांनी कथा व इतरही लेखन केले आहे.

पुढील कथेतील मुलगा अत्यंत कष्टाने शिक्षण घेत आहे. त्याने कोणती 'भेट' दिली व का ते या कथेत वाचा.

आज कित्येक वर्षांनी दिल्लीत स्थायिक होण्याचा पुन्हा मला योग आला होता. फिरून एकदा कितीतरी वर्षांनी मी जुन्या दिल्लीत निघालो होतो. चांदणी चौक या नावाने जो भाग ओळखला जातो त्या भागातल्या बऱ्याच गोष्टी माझ्या परिचयाच्या होत्या. तिथले देऊळ, तिथली रहदारी, तिथली दुकाने सारे सारे मला आठवत होते.

मला थोडीबहुत खरेदी करायची होती; ती मी आधीच केली होती. माझी बेबी आता नुकतीच इंग्रजी शिकायला लागली होती. तिच्यासाठी पहिले प्रायमर आणायचे मी कबूल केले होते. ते मी एका छोट्या पुस्तकाच्या दुकानात जाऊन खरेदी केले आणि घरी परत निघालो.

रस्त्याच्या दोन्ही बाजूंला फूटपाथवरून छोट्या छोट्या लाकडी खोक्यांवर पुरी-भाजीची, चिक्कीची, खजूर-मिठाईची दुकाने निर्वासितांनी थाटली होती. जीवनातली त्यांची चाललेली ती धडपड पाहून माझे मन गुदमरून गेले. मी नजर वळवली. पंधरा पावले पुढे गेलो आणि फिरून एका दृश्यावर माझे लक्ष वेधून राहिले.

एक चार चाकांची 'हरेक वस्तूंनी' भरलेली हातगाडी एका झाडाच्या आडोशाला उभी होती. त्या गाडीच्या खाली सावलीत एक दहाबारा वर्षांचा

तरतरीत मुलगा देवदारी खोक्यावर मान खाली घालून बसला होता. मधून मधून मांडीवर उघडून ठेवलेल्या पुस्तकात पाहून तो पाटीवर लिही. तो अभ्यासात अगदी मग्न झालेला होता.

खरे तर हसायचे, खेळाबागडायचे वय होते त्याचे ते! पण या वयात केवढी समज आली होती त्याला!

एवढ्या लहान वयात हातपाय हालवून स्वतःचे पोट भरायला तर तो शिकला होताच. शिवाय त्यातूनही वेळ काढून अक्षरओळख करून घ्यावी अशी त्याची धडपड चालली होती; त्याचे मला फार फार कौतुक वाटले.

त्याच्याशी चार शब्द बोलावेत अशी मला फार इच्छा झाली. त्या दिशेने माझे पाय वळले.

त्याच्या गाडीशेजारी मी थबकलो, तेव्हा 'क्या चाहिये बाबूजी?' असे म्हणून त्याने मालाचे गुणवर्णन सुरू केले. 'कोईबी चीज चार चार आना,' असे पुन्हा पुन्हा तो मला सांगत होता.

धाकट्या बेबीसाठी एखादे खेळणे घ्यावे असे वाटले. गळ्याभोवती रंगीत रेशमी फीत असलेला एक कापडाचा कुत्रा खरेदी केला. बेबीला आकाशी रंगाची आवड आहे म्हणून फिक्या निळ्या रंगाची मी निवड केली.

पैसे देण्यासाठी मी खिशात हात घातला. बरीचशी चिल्लर हातात आली. त्यातले एक नाणे मी त्याच्यापुढे केले; पण त्याची नजर माझ्या हातातील प्रायमरवर खिळून राहिली होती.

"बाबूजी," म्हणून त्याने मला हटकले. "थोडं ते प्रायमर पाहू देता का?" असे मला त्याने विचारले.

त्याच्या हाती पुस्तक देत मी म्हटले, "हो, पाहा ना."

त्याने पुस्तकाचे नाव पाहिले आणि मघा तो ज्या पुस्तकात पाहून पाटीवर लिहीत होता, ते पुस्तक त्याने उघडले.

त्यातले एक पान अर्धे फाटले होते. माझ्याकडून घेतलेल्या पुस्तकात पाहून तो आपल्या वहीत काहीतरी उतरून घेऊ लागला. ते पाहून मी म्हटले, "तू हे काय करतोस?" त्यावर लिहिता लिहिताच तो मला म्हणाला,



"माझ्या पुस्तकातलं हे अर्धं पान फाटलं आहे तेवढं उतरून घेतो म्हणजे त्यासाठी पुन्हा दुसरं पुस्तक मला विकत घ्यायला नको. माफ करा. तुम्हांला थोडी तसदी देत आहे". असे म्हणून तो पुन्हा भरभर लिहू लागला.

त्याच्या त्या कृतीचे, भाबड्या नि धीट स्वभावाचे मला अतिशय कौतुक वाटले. त्याच्याकडे मी आदराने पाहातच राहिलो. माझ्या मनात एक कल्पना आली आणि मी म्हणालो, "थांब हं, इकडे आण ते पुस्तक." असे म्हणून त्याला मध्येच अडवून, त्याच्या हातून मी पुस्तक घेतले आणि त्याला विचारले, "तुझं नाव काय?"

"इंद्रजितसिंग."

माझ्या कोटाच्या वरच्या खिशातून मी पेन काढले आणि प्रायमरमधल्या पहिल्या कोऱ्या पानावर लिहिलं, 'इंद्रजितसिंग यास सप्रेम भेट.' त्याखाली मी माझे स्वतःचे नाव लिहिले.

माझ्या या कृतीचा त्याला काहीच अर्थबोध होईना. तो मला म्हणाला, "तुम्ही हे काय करता आहात?"

त्याच्या हाती पुस्तक देत मी म्हटले, "तुला हे पुस्तक भेट म्हणून देत आहे."

"बाबूजी, तसं नको. कुणाकडून फुकट काही घेतलेलं माझ्या आईला खपत नव्हतं."

"मी तुला तसंच देत नाही; भेट म्हणून देत आहे. भेट नाकारायची नसते." मी असा आग्रह केला, तेव्हा ते पुस्तक हाती घेत तो म्हणाला,

"फार आभारी आहे मी तुमचा." असे म्हणत त्याने पुस्तकाचा हसत हसत स्वीकार केला व मला विचारले, "हा कुत्रा तुम्ही कुणासाठी घेतलात?"

मी म्हटले, "मला एक छोटी मुलगी आहे, तिच्यासाठी."

"आणि हे पुस्तक कुणासाठी घेतलं होतंत?"

"तिच्याहून दोन वर्षांनी एक मोठी मुलगी आहे, तिच्यासाठी."

"मग तिला माझी एक भेट द्या." असे म्हणून गाडीतला नेताजींचा मुखवटा असलेला एक रंगीत बिल्ला उचलून तो माझ्या हाती देत त्याने विचारले, "तुमच्या बेबीला हा आवडेल?"

"हो आवडेल."

"तिचं पुस्तक तुम्ही मला दिलंत; ती आता तुमच्यावर रागावणार नाही ना?"

"नाही. तिला मी दुसरं घेऊन देईन. तू कितवीत आहेस?"

"आताच इंग्रजी शिकू लागलोय, पहिलीत आहे."

"तुला अभ्यास कर म्हणून कोण सांगतं?"

"कुणी सांगत नाही. मी एकटाच आहे. आईची फार इच्छा होती, की मी वडलांप्रमाणं शिकून वकील व्हावं म्हणून...."

"शीक, शीक.... मोठा हो!" असा आशीर्वाद देऊन मी निघालो. चालता चालता फिरून एकदा नकळत मी मागे वळून पाहिले. मी दिलेले नवे पुस्तक त्याच्या हाती होते. ते वाचण्यात तो किती गुंग होऊन गेलेला होता!

अभ्यास :

१. लेखकाने आपल्याजवळचे प्रायमर इंद्रजितसिंगास भेट म्हणून का दिले?
२. इंद्रजितसिंगाच्या स्वभावातील कोणत्या गोष्टी तुम्हांला आवडल्या?
३. हा घडलेला प्रसंग इंद्रजितसिंग आपल्या मित्रास सांगत आहे, अशी कल्पना करून तो थोडक्यात लिहा.
४. मुलीला बिल्ला मिळाल्यानंतर ती इंद्रजितसिंगास आभाराचे पत्र लिहिते अशी कल्पना करून ते पत्र दहा–बारा ओळींत लिहा.





# ४. डॉ. पंजाबराव देशमुख

## मधुकर केचे

**मधुकर केचे** (जन्म : १९३२.) यांनी हा पाठ लिहिला आहे. 'दिंडी गेली पुढे', 'पुनवेचा थेंब', 'आसवांचा ठेवा' हे त्यांचे कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत. काही चरित्र-लेखनही त्यांनी केले आहे.

महान व्यक्ती काही आपोआप महान झालेल्या नसतात. त्यामागे त्यांचे महान कर्तृत्व उभे असते. डॉ. पंजाबराव देशमुख यांना परिस्थितीशी झगडावे लागले होते. त्यांच्या कर्तृत्वाचा व त्यांच्या थोर कार्याचा ओझरता परिचय इथे करून दिला आहे.

पापळ हे अमरावती जिल्ह्यातील एक छोटेसे गाव. पन्नास-साठ वर्षांपूर्वी या गावात फारशा सोयी नव्हत्या. अशा या आडवळणाच्या गावी शामराव बापू नावाचा एक गरीब कष्टाळू शेतकरी राहात होता. बापूंचा मुलगा फारच चुणचुणीत होता. या मुलाचे नाव होते पंजाब. घरी सर्व त्याला 'भाऊ' म्हणून हाक मारीत. भाऊला शाळेत थोडे उशिराच दाखल करण्यात आले. तेव्हा त्याचे वय साडेसात वर्षांचे होते. गावातील शाळेत फक्त तीन इयत्ता होत्या. भाऊचे तिसरीपर्यंतचे शिक्षण संपले. पुढे काय करावे हा प्रश्न बापूंना पडला. पापळला चौथीचा वर्ग नव्हता म्हणून भाऊचे एक वर्ष वाया गेले.

आपल्या मुलाने खूप शिकावे, असे बापूंना मनापासून वाटायचे. त्यांनी त्याला सोनगावला मामांकडे पाठवले. सोनगावहून पाच कि. मी. वर असलेल्या चांदूरच्या शाळेत त्यांनी भाऊचे नाव घातले. भाऊला सोनगावहून चांदूरला रोज पायी जावे-यावे लागत असे. त्याला होत असलेला हा त्रास बापूंना पाहवेना. त्यांनी पुढच्या वर्षी त्याला कारंजाला ठेवले. तेथे भाऊ आपल्या मावसभावाकडे राहून शिकू लागला.

येथेही आपल्या हुषारीच्या जोरावर भाऊने दरवर्षी परीक्षेत भरघोस यश मिळवले. शिष्यवृत्तीसाठी अमरावतीला होणाऱ्या परीक्षेला त्याने बसावे असे शिक्षकांना वाटले. ही परीक्षा देण्यासाठी भाऊ अमरावतीस गेला. तेथे वसतिगृहात तो अभ्यासाला बसला असता आवारात मुलांचे मोठमोठ्याने बोलणे त्याला ऐकू आले. त्या वेळी मॅट्रिकची परीक्षा चालू होती. भूमितीचा पेपर देऊन ही मुले नुकतीच परतली होती. भाऊच्या खोलीजवळ भूमितीच्या एका उदाहरणासंबंधी काही विद्यार्थी मोठमोठ्याने वाद घालत होते. भाऊने त्यांच्या हातांतील प्रश्न-पत्रिका मागून घेतली व ते उदाहरण वाचले. त्या मुलांचे उत्तर चूक होते. भाऊने त्यांना ते उदाहरण चटकन सोडवून दाखवले. भाऊ तेव्हा आठव्या इयत्तेत शिकत होता. त्याची ही हुषारी पाहून मुले अगदी थक्क होऊन गेली.

भाऊची चिकाटी वाखाणण्यासारखी होती. तो अमरावतीला शिकत असताना छात्रालयात राहात असे. त्या छात्रालयात लोणी येथील काही मुलेही राहात होती. एकदा लोणीचे डॉ. मालपे आपल्या गावच्या मुलांना भेटायला तिथे आले होते. इतरांना गणितातील कोडी घालायची व त्यांच्या बुद्धीची परीक्षा पाहायची हा डॉ. मालप्यांचा छंद. त्या रात्री त्यांनी छात्रालयातील काही मुलांना एक कोडे घातले. विद्यार्थ्यांनी ते सोडवायचा खूप प्रयत्न केला. शेवटी निराश होऊन ते झोपी गेले. नाटक पाहायला गेलेले डॉ. मालपे रात्री तीनच्या सुमारास छात्रालयात परत आले. सारी मुले डाराडूर झोपली आहेत, पण एक मुलगा मात्र कसला तरी विचार करत बसला आहे, असे त्यांना दिसले. डॉक्टरांना त्याचे फार कौतुक वाटले. त्यांनी त्या मुलाला झोपायला सांगितले. त्याला ते कोडे काही सुटले नव्हते. काहीशा अनिच्छेनेच भाऊ झोपी गेला. पण सकाळी उठल्याबरोबर मात्र त्या कोड्याचे उत्तर त्याने डॉ. मालप्यांना सांगितले. त्यांनी भाऊची पाठ थोपटली.

पुण्याला तो फर्ग्युसन कॉलेजमध्ये शिकत होता. त्याच वेळी उच्च शिक्षणा-साठी आपणही इंग्लंडला जावे, अशी त्याला इच्छा झाली. त्याचे आईवडील गरीब होते. त्यांची थोडीफार शेती होती. भाऊची इच्छा पूर्ण करावी म्हणून त्यांनी सावकाराकडे जमीन गहाण टाकली. अशा रीतीने कर्ज काढून त्यांनी



भाऊला इंग्लंडला पाठवले. तेथे पीएच्. डी. ही उच्च पदवी त्यांनी संपादन केली. शिवाय ते बॅरिस्टरही झाले.

आपले उच्च शिक्षण संपवून भाऊ आपल्या मायदेशी परत आले. त्यांनी वकिली सुरू केली. पैसाही भरपूर मिळू लागला. परदेशात मिळवलेल्या बॅरिस्टरीच्या जोरावर भाऊंना लाखो रुपये कमावता आले असते, पण त्या पैशाचा मोह त्यांना झाला नाही. त्या वेळची दीनदुबळी जनता त्यांच्यासमोर उभी राहिली. गरिबीमुळे हजारो लोक आपल्या मुलांना उत्तम शिक्षण तर सोडाच, पण पुरेसे अन्नही देऊ शकत नाहीत हे त्यांनी पाहिले होते. अमरावतीला त्यांनी श्रीशिवाजी शिक्षण संस्थेची स्थापना केली. वऱ्हाडभर शाळा-कॉलेजे सुरू करून त्यांनी शिक्षणाचा प्रसार केला. मागासलेल्या जातींच्या, गरीब व खेड्यातल्या अशा कुठल्याही मुलांना आता शिक्षणाची संधी उपलब्ध झाली आहे, याचे बरेचसे श्रेय डॉ. पंजाबरावांनाच आहे.

देशातील दुःख-दारिद्र्य नाहीसे व्हायचे असेल तर शिक्षण खेड्यापाड्यांपर्यंत पोचले पाहिजे, असे त्यांना वाटत असे. म्हणून तर त्यांनी शिक्षणाचा

एवढा प्रसार केला. त्याचबरोबर त्यांनी शेतकऱ्यांच्या कल्याणासाठी अनेक संस्था निर्माण केल्या. १९५२ ते १९६२ अशी दहा वर्षे ते आपल्या भारताचे कृषिमंत्री होते. त्यांनी आपल्या देशात जपानी पद्धतीच्या भातशेतीचा खूप प्रचार केला. त्यामुळे भाताचे दर एकरी उत्पन्न खूप वाढले. दिल्ली येथे पहिले जागतिक कृषि-प्रदर्शन भरवण्यात त्यांचाच पुढाकार होता.

१९४५ मध्ये आझाद हिंद सेनेच्या नेत्यांवर इंग्रज सरकारने खटला भरला होता. तो खटला दिल्लीच्या लाल किल्ल्यात चालू होता. आझाद हिंद सेनेच्या बचावासाठी निष्णात वकिलांची आवश्यकता होती. विनावेतन वकिली करणाऱ्या वकिलांची देशाला गरज होती. त्या वेळी डॉ. पंजाबराव देवास संस्थानचे मंत्री होते. त्यांना दरमहा तीन हजार रुपये पगार मिळत होता. ती नोकरी सोडून त्यांनी बॅरिस्टरीचा झगा अंगावर चढवला व आझाद हिंद सेनेची वकिली विनावेतन केली.

अशी होती त्यांची देशभक्ती ! अशा त्यांच्या देशसेवेच्या किती गोष्टी सांगाव्या !



छात्रालय – वसतिगृह, विनावेतन – पगार किंवा मोबदला न घेता, वाखाणणी – कौतुक, पीएच्. डी. ही पदवी मिळवणाऱ्याच्या नावामागे 'डॉक्टर' असे लिहिण्याचा प्रघात आहे.



**अभ्यास :**

१. डॉ. पंजाबराव देशमुख यांच्या चिकाटीचे एक उदाहरण सांगा.
२. वऱ्हाडात शिक्षणाचा प्रसार व्हायला पाहिजे, असे डॉ. पंजाबरावांना का वाटे ?
३. शेतकऱ्यांच्या कल्याणासाठी त्यांनी कोणकोणती कामे केली ?
४. मागासलेल्या, गरीब व खेड्यांतील मुलांच्या शिक्षणासाठी झटणाऱ्या थोर व्यक्तींची नावे सांगा.
५. वाक्यांत उपयोग करा :
भरघोस, छंद, निष्णात, छात्रालय, पुढाकार.





# ५.
# मृगाजिन
## ब. ग. कुलकर्णी

**बलवंत गबाजी कुलकर्णी** (जन्म : १९०७.) शिक्षकी पेशा; साने गुरुजींचे एक विद्यार्थी-सहकारी. पुढील उतारा त्यांनी लिहिलेल्या 'मृगाजिन' या पुस्तकातून घेतला आहे.

ज्यांना आपण मानतो त्यांच्यासाठी काही करण्यात आपल्याला आनंद वाटतो. पण अशा वेळी नेहमीच आपल्या हातून योग्य कृती घडते असे नाही. पुढील गोष्टीत असाच एक प्रसंग आहे. गुरुजी म्हणजे मुलांचे दैवत! तडवी नावाचा एक विद्यार्थी आपल्या गुरुजींसाठी काय करतो व पुढे काय घडते, हे पुढील उतारा वाचा म्हणजे कळेल.

गुरुजींच्या छात्रालयात एक तडवी नावाचा मुलगा होता. चांगली उंच परंतु किंचित सडपातळ अशी त्याची अंगकाठी होती. त्याच्या चेहऱ्यावर विनय व आवाजात माधुरी होती. तडवी म्हणजे अती अबोल. कुणीही बोलावे आणि तडवीने श्रोत्याचे काम करावे.

एके दिवशी मधल्या मोठ्या सुटीत नेहमीप्रमाणे मुले गुरुजींच्या खोलीत जमली. गुरुजी मधल्या सुटीत विहिरीवर जात; त्याप्रमाणे ते बादली, तांब्या घेऊन गेले. इकडेतिकडे काही पुस्तके पडली होती. काही मुले ती पुस्तके चाळू लागली. जवळ मृगाजिन पडले होते. आकाराने ते लहानच होते. परंतु त्याच्यावरील सारे केस उडाले होते. बारीक बारीक भोकेही त्याला पडली होती. त्याच्याकडे पाहून एक मुलगा म्हणाला, "हे मृगाजिन अती भाग्याचं. गुरुजींच्या पायाची धूळ नेहमीच अंगावर घेतं. कधी कंटाळा नाही; कुरकूर नाही. आपला देहच त्यानं जणू झिजवला."

"गुरुजींना का नवीन मृगाजिन नको आहे? परंतु त्यांना ते मिळावं कसं?" दुसरा म्हणाला.

इतक्यात शाळेची घंटा झाली. मुले पळाली. गुरुजी धोतर धुऊन आले तो मुले पळालीही होती.

या गोष्टीला काही दिवस लोटले. शाळेचे पहिले सत्र संपले. दिवाळीची सुटी लागली. सुटी सुरू झाली तशी ती संपलीही. बाहेर गेलेली मुले नव्या उत्साहाने परतली. एकमेकांना भेटताना त्यांना खूप आनंद होऊ लागला. तडवीही आपल्या मित्रांसह गावात आला होता. मित्रमंडळींचा बोलण्याचा विषयही इतरांप्रमाणेच 'सुटी कशी घालवली' असाच होता. मध्येच तडवीला आठवण येऊन तो आनंदून म्हणाला, "अरे, तुम्ही उद्या सारे मधल्या सुटीत भेटा अं!"

सर्व त्याच्याकडे पाहू लागले.

"तुम्हांला मी एक गंमत सांगणार आहे."

सर्वांचेच कुतूहल वाढले.

"सांग की, कळू दे तुझी गंमत!" अधीरपणे एकाने म्हटले.

दुसऱ्या दिवशी शाळा भरली. मुलांचे डोळे मधल्या सुटीकडे लागले. आज चौथा तास संपेना. 'शिपाई झोपला आहे का घड्याळ बंद पडले आहे?' मुले आपापसात कुजबुजू लागली. तेवढ्यात घंटा झाली.

मुले आपापल्या वर्गांतून बाहेर पडली. तडवी आज मधल्या वेळचा फराळही विसरला. इकडेतिकडे कुठेही गुरुजी नाहीत अशी त्याने खात्री करून घेतली. आसपास ते नाहीत असे पाहून तो प्रार्थनामंदिरात गेला. तिकडून तो परत येताच मुले गोळा झाली.

"काय हो, सांगा ना तुमची ती गंमत?" आम्ही म्हणू लागलो.

"गंमत सांगताना फारसे आढेवेढे घेऊ नये. लोकांच्या मनावर उगीचच ताण पडतो." एक जण काकुळतीने म्हणाला.

"थांबा, अशी गर्दी करू नका." तडवी म्हणाला. पांढऱ्या शुभ्र कापडात काहीतरी गुंडाळले होते. आम्हांला वाटले, त्याने काहीतरी खायला आणले असावे. बाहेरगावाहून येणारा मुलगा आपल्याबरोबर काहीतरी आणतोच ना? तडवीने डोळे मोठे करून सर्वांस दटावून सांगितले, "चूप!"

आम्हांला अधिकच हसू आले. तडवी पुन्हा मोठ्याने म्हणाला, "चूप, आपण सारेच आज गुरुजींना चकित करणार आहोत."

तडवी हळूहळू कापड दूर करू लागला. आमचे सर्वांचे त्याकडे डोळे लागलेच होते. शेवटी एक सुंदर असे मृगाजिन बाहेर आले. ते पाहून सर्वांनाच आनंद झाला. तडवी मात्र अधिक गंभीर होऊन म्हणाला, "मृगाजिनाविषयी आपला झालेला वाद तुम्हांस आठवत असेल. त्या दिवसापासून नवं मृगाजिन माझ्या डोळ्यांपुढं फिरू लागलं. सुटीत मी घरी गेलो. सातपुड्याच्या टेकड्यांमध्ये माझं घर आहे. सातपुडा म्हणजे खानदेशाचं वैभव. दरवर्षी मी मोठ्या सुटीत घरी जातो. तेव्हा रानावनातून हिंडतो, घोड्यावर बसतो, रपेटीही करतो. या वेळीही दिवाळीला घरी गेलो; रानात गेलो. हरणांचा मोठा कळप पाहिला. त्यात एक मोठा थोरला काळवीट होता. कळपाच्या पुढं किती डौलदार गतीनं तो चालला होता!"

"तडवी. पुढं त्याचं काय झालं? सर्व सांग, सांग लवकर. नाहीतर सुटी संपेल." बाळकृष्ण अधीर होऊन म्हणाला.

"ठीक" म्हणून तडवी सांगू लागला, "काळवीट साध्या हरणापेक्षा खूप मोठा असतो. त्याची शिंगंही मोठी असतात. हा काळवीट कळपाच्या पुढं



होता. मधूनमधून शिंगानं माती उकरत होता. मी दुरून हे बघत होतो. मला एकदम गुरुजींच्या मृगाजिनाची आठवण झाली. माझा घोडा शिकारीला फारच पटाईत आहे. त्याला टाच दिली. त्यानं रोख ओळखला. वाऱ्याप्रमाणं तो हरणांच्या मागं लागला. माझ्याजवळ काडतुसं भरून बंदूक तयार होतीच. हरणी पळाल्या. काळवीट व त्यामागं घोडा यांची जणू शर्यतच लागली. अधूनमधून काळवीट थांबून मागं पाहू लागला. घोडाही त्याच्या दिशेनं धावला. काळवीट मान फिरवून पळू लागताच एका काटेरी जाळ्यात त्याची शिंगं अडकली. मी लगेच चाप ओढला. बंदुकीचा आवाज झाला. काळवीट धाडकन् खाली आदळताच मी खाली उतरलो. त्यानं आपले चारही पाय पोटाशी आवळले होते. डोळे वर लावले होते. जखमेतून रक्त भळभळत होतं. थोड्याच वेळात त्यानं प्राण सोडला. पावऱ्यांना मी बोलावलं. त्याचं कातडं काढलं आणि ते इथं आणलं."

तडवीचे बोलणे संपले. त्याने रुमालाने आपले ओठ पुसले. कपाळ पुसले. बाळकृष्णाने ते मृगाजिन हाती घेतले. लांब-रुंद ते मृगाजिन. त्यामागे तडवीचा पराक्रम होता. रामने जुने उचलले व तेथे हे नवीन घातले. सर्व तिकडे बघत होते.

गुरुजी एका हातात धोतराचा पिळा व दुसऱ्या हातात बादली घेऊन हळूहळू येत होते. आम्हांला पुन्हा हसू आले. आता गुरुजी चकित होणार ना! आमचा अभिमान वाढत होता. पराक्रम दुसऱ्याचा, आनंद मात्र आम्हांला!

गुरुजी आले. त्यांनी बादली खाली ठेवली. नंतर धोतर झटकून बांबूवर घातले व ओले हात धोतरालाच पुसत ते खोलीत शिरले. आम्ही ओठ दाबून हसू लागलो. गुरुजींनाही काही गमतीदार घडले असल्याची जाणीव झाली. ते इकडेतिकडे बघू लागले. त्यांना काहीच दिसेना. खाली पाहिले, तोच बाळकृष्णाने टाळी वाजवली. सर्व खो-खो हसू लागले. गुरुजींना नवे मृगाजिन दिसले. त्यांनी विचारले, "कुणी रे आणलं हे?"

"तडवीनं, गुरुजी." राम म्हणाला.

"होय रे तडवी, तू का आणलंस? फारच सुंदर नि मोठं आहे, हो!" गुरुजी आनंदून म्हणाले.



"मागे एकदा ह्या तुमच्या फाटक्या मृगाजिनाविषयी आमचं बोलणं झालं होतं. त्याच वेळी तडवीनं आणायचा निश्चय केला होता." मोहन म्हणाला.

"परंतु आमची आतापर्यंत खूप करमणूक झाली. तडवीनं शिकारीचं किती सुंदर वर्णन केलं. गुरुजी, याला सातपुड्याचा फार अभिमान आहे. तडवी इतकं बोलू शकतो हे कुणासही खरं वाटणार नाही. गुरुजी खरंच. तडवी वरून दिसतो तसा नाही." गजाननने तडवीची स्तुती केली.

तडवी खाली बघत होता. केल्या श्रमाचे आज त्याला समाधान मिळाले होते. मुले त्याच्याकडे बघत राहिली. त्यानंतर ती गुरुजींकडे बघू लागली. तडवीनेही मान उंच केली. गुरुजींचे डोळे भरून आले होते.

"तडवी, माझ्याकरता का एका स्वच्छंदी, आनंदी प्राण्याला तू ठार केलंस? किती वर्षांचा होता तो? किती आनंदाने खेळला असेल आतापर्यंत! कुणालाही त्याचा उपसर्ग नव्हता ना? का मारलंस त्याला? खावं, प्यावं, उड्या माराव्या परंतु त्रास नाही हो देऊ कोणाला! किती मऊ त्याचं अंग. रेशमासारखे केस. खडबडीतपणा जणू नाहीच कशाला! जवळ घ्यावं, येतं धावत. खातं झाडपाला नि कोवळं गवत. माणसाच्या माणुसकीवरच यांचा सारा विश्वास. फार फार प्रसन्न हा प्राणी. कोवळं कोवळं गवत खाता खाता वाढतो. मोठा होतो, खेळतो, बागडतो, वृद्ध होतो. नंतर मरण आलं तरच त्याचं मृगाजिन घ्यावं हो. तसं तू केलं नाहीस. तू माझ्याकरता—अगदी माझ्याकरताच एका निरपराधी आनंदी प्राण्याला ठार मारलंस!"

तडवीने मान वर केली. त्याच्याही डोळ्यांत अश्रू दिसत होते. भरल्या डोळ्यांनी पाहून तो म्हणाला, "गुरुजी, यापुढं नाही मारणार मी हरीण.

त्यांच्यासारखा होईन मी पवित्र. निदान प्रयत्न तरी करीन.'' तडवीने डोळ्यांना रुमाल लावला.

गुरुजींची ही शिकवण आमच्या हृदयांवर कायमची कोरली गेली आहे.

मृगाजिन–हरणाचे किंवा काळविटाचे कातडे.

पावरी–भिल्लांची एक जात.

**अभ्यास :**

१. तडवीला आपल्या श्रमाचे समाधान का वाटले? ते समाधान का टिकले नाही?

२. गुरुजींच्या मते कोणते मृगाजिन वापरायला हरकत नव्हती?

३. या पाठातील शिकारीचे वर्णन करणारी वाक्ये शोधा. शिकारीच्या प्रत्येक कृतीचे चित्र काढावयाचे असेल तर कोणकोणती चित्रे काढावी लागतील?

४. हरीण बोलू लागते अशी कल्पना करा व आपल्याला मारू नये म्हणून ते शिकाऱ्याला काय काय सांगेल, ते आठ-दहा ओळींत लिहा.



# .६.
# तात्या
## जयवंत दळवी

**जयवंत दळवी** (जन्म : १९२५.) शिक्षण–एम्. ए. यांच्या काही पुस्तकांना महाराष्ट्र सरकारची पारितोषिके मिळाली आहेत. 'तात्या' हा उतारा त्यांचे 'सारे प्रवासी घडीचे' या पुस्तकातून घेतला आहे.

काही व्यक्तींना काही गोष्टींचे वेड असते. या पाठातील तात्या हाही एक असाच निसर्गवेडा माणूस. निसर्ग म्हणजे त्याचा जीव की प्राण! निसर्गावरचे त्याचे हे जगावेगळे प्रेम पाहून लोक त्याला वेडा म्हणत. पुढील व्यक्तिचित्र वाचा आणि तात्याबद्दल तुम्हांला काय वाटते, पाहा.

तात्याला लोकांनी वेडा म्हटले ते योग्य नाही, असे आता मला राहून राहून वाटते.

मला वाटते, तात्या हा निसर्गप्रेमी होता. तो वेडा नव्हता अगर वेडसरही नव्हता. त्याने फक्त वेड्यासारखे निसर्गावर प्रेम केले. पण निसर्गावर प्रेम करण्याची कल्पनाच आमच्या गावी वेडगळपणाची ठरली!

अर्थात तात्याला मात्र स्वतःला मिळालेल्या उपाधीचे कधीच काही वाटले नाही. आपल्याला लोक वेडा म्हणतात हे त्याला ठाऊक होते; पण भोवताली लोक नाहीतच अशा समजुतीने तो वागायचा. झाडाझुडपांच्या संगतीतच तो अधिक असायचा. फुलझाडांवरच्या कळ्या काढू नयेत, माडावरचे नारळ काढू नयेत, पडलेले तेवढेच नारळ घ्यावेत अशी त्याची काही अव्यवहारी मते होती.

श्रावणात मी पत्री गोळा करू लागलो की तात्या हटकून थांबत असे. नागपंचमीला पाच झाडांची पाच-पाच पाने, गोकुळाष्टमीला आठ-आठ पाने अशी पत्री जमा करावी लागत असे. अशा वेळी तात्या गंभीर होऊन थांबायचा. उजव्या हातातली काठी पाठीमागे टेकून तिच्यावर थोडासा रेलायचा आणि

संथपणे आग्रही आवाजात म्हणायचा, "आपू, डोळे झाकून पत्री काढू नको. पानं मोजून घे. गावली म्हणून ओरबाडू नको झाडं. दुखावतील रे ती–"

देवधर्मासाठी म्हणून थोडी पाने खुडावीत, पण ती निश्चित मोजून. एक पान फुकट जाता कामा नये, असा त्याचा कटाक्ष होता.

पानांमुळे झाडे श्वास घेतात–सोडतात असाही एक शास्त्रीय सिद्धान्त सांगून तो अंगाला वळसे देत पुढे चालू लागायचा.

एकदा तर संतापाच्या भरात त्याने माझ्यावर काठीसुद्धा उगारली होती. मारली नाही म्हणून ठीक; नाहीतर हाताचे किंवा बरगडीचे हाड मोडले असते. आणि त्यात त्याला काहीही वाटले नसते. हाड मोडले तर काय मोठेसे ? झाड मोडले असते तर तो हळहळला असता.

पण हे सारे व्हायला कारण काय ?

तो प्रसंग मला आठवतो.

एकदा सकाळी मी शेतातून चाललो होतो. शेतातल्या मेरेवर लाजरीच्या वेली होत्या. त्यांवर लाथा मारीत मी पुढे पुढे चाललो होतो. लाजरीची पाने पटापट मिटत होती. ते पाहून मला गंमत वाटत होती. तेवढ्यात तात्याने मला कोठून पाहिले कोण जाणे ! तो धावत आला आणि दोन्ही हातांनी काठी उगारून त्याने दोनचार शिव्या हासडल्या. झाले काय तेच मला कळले नाही. क्षणभर घाबरलो हे खरे. पण पळालो नाही. तात्याच्या तोंडाकडे टकमक पाहात राहिलो. तात्या धावला होता म्हणून त्याला दम लागला होता.

"झालं काय ओरडायला ?" मीही जरा दमात घेतले.

"आपू, नको रे मुला लाजरीची नासाडी करू. अरे, लाजाळू वनस्पती ती. तिचा नको असा छळ करू !"

लाजरीच्या वेलीवर लाथा मारल्यामुळे तिचा छळ कसा होतो, ते मला कळले नाही. परंतु तात्याचा कळवळलेला जीव पाहून मी सर्द झालो. आणि पुन्हा लाजरीवर लाथ न मारता रस्त्याने चालू लागलो.

जादूगार, शाहीर, डोंबारी ही मंडळी गावोगावी नेहमीच यायची आणि शाळेशी सलगी करायची. मग शाळेतल्या प्रत्येक पोराकडून पैसा, दोन पैसे

वर्गणी काढून रुपया दीडरुपया जमला, की शाळेच्या मुलांसाठी एक खेळ व्हायचा. एकदा डोंबाऱ्याचा असाच खेळ होता. डोंबाऱ्याचा खेळ म्हणजे सारे ठरलेले असायचे. आवाज फार आणि कृती कमी. ढोलक्याचा आवाज आणि तोंडाचा आवाज. खेळ म्हणजे पोरांच्या दोनचार उलट्यासुलट्या उड्या. तारेवरची करामत आणि मेंढ्यांची टक्कर.

डोंबाऱ्याच्या पोराच्या उलट्यासुलट्या उड्या झाल्या. मग डोंबाऱ्याच्या बायकोची तारेवरची कसरत सुरू झाली. तारेचे एक टोक काठीला आणि दुसरे टोक झाडाच्या फांदीला बांधले होते. डोंबाऱ्याची बायको तोल सांभाळीत नुकतीच कुठे दोरीवरून चालत होती. त्यामुळे झाडाची फांदी थरथरत होती.

तेंवढ्यात तात्या हजर झाला.

झाडाची फांदी थरथरत आहे हे पाहताच तात्या कळवळला. मोठमोठ्याने आरडाओरडा करून त्याने डोंबाऱ्याच्या बायकोला खाली उडी टाकायला



लावली. डोंबाऱ्याच्या अंगावर काठी उगारून फांदीचा दोर सोडायला लावला आणि हातवारे करत करड्या आवाजात त्याने सर्वांची खरपूस हजेरी घेतली.

"बिचारी फांदी थरथर कापली; तरी देवानं तुम्हांला काडीची अक्कल दिली नाही. कसले खेळ करतात ?" असे ओरडत त्याने मोठमोठ्या आवाजात सर्वांचा उद्धार केला.

तारेवरची कसरत बंद पडताच डोंबाऱ्याने मेंढ्याचा खेळ सुरू केला. मेंढा समोरून धावत यायचा आणि डोंबाऱ्याच्या हातांतल्या दगडावर टक्कर द्यायचा. त्या दगडाच्या ठिकऱ्या उडायच्या. हा प्रयोग तीनदा करण्यासाठी डोंबाऱ्याने तीन दगड आणून ठेवले होते. पण पहिला दगड फुटताच तो दगड आपल्याच डोक्यावर आपटून फुटल्याप्रमाणे तात्या कळवळून ओरडला— "गरीब जनावराचा नको रे छळ," असे मोठ्याने ओरडत त्याने डोंबाऱ्याच्या कमरेला विळखा घातला. डोंबाऱ्याने हाती घेतलेला दुसरा दगड त्याला शेवटी खाली टाकावा लागला. पण बिचाऱ्या मेंढ्याला ते काही कळले नाही. सवयीनुसार तो धावत आला आणि लोक ओरडत असतानाच त्याने तात्याला धडक दिली. त्यामुळे तात्या आणि डोंबारी दोघेही कोलमडून पडले. पण दुखापत झाली ती तात्यालाच. तो महिनाभर बिछान्यावर पडून राहिला. डोंबारी दुसऱ्या दिवशी आपल्या लवाजम्यानिशी दुसऱ्या गावी चालता झाला.

त्यानंतर जवळजवळ महिनाभर गाव नुसता हसत होता; खुळ्या तात्याची चेष्टा चालू होती.

पण तात्याने मात्र ती चेष्टा मनावर घेतली नाही. बरा होताच तो पुन्हा हिंडू-फिरू लागला. पुन्हा निसर्गाशी एकरूप होऊ लागला.

मला आठवते, तात्या एखाद्या झाडाच्या सावलीत तासन्तास मुकाटपणे बसलेला असायचा. जमिनीवरचा चारा न्यहाळायचा. झाडावरची फुले नुसती हुंगायचा आणि गोंजारायचा. पहिला पाऊस पडला म्हणजे त्याच्या सरी अंगावर घ्यायचा. भिकेडोंगरी ही गावची स्मशानभूमी. पण तिथून गावची वनराजी दिसते म्हणून तो बराच वेळ त्या स्मशानात बसून राहायचा. जेवून झाल्यावर

दोन घास कुत्र्यांना घालायचा. तोंडाने 'आ–आ' करत चार शिते कावळ्यांसाठी शिंपडायचा. शेतात चरणाऱ्या गाई-म्हशींच्या पाठींवरून हात फिरवायचा.

असा हा आमचा तात्या ! मग सांगा, त्याला वेडा म्हणणे योग्य आहे काय ?



राहून राहून वाटणे – पुन्हा पुन्हा वाटणे, मेर – शेताचा बांध, लवाजमा – नोकरचाकर, परिवार.

**अभ्यास :**

१. तात्याची कोणती मते लोकांना अव्यवहारी वाटायची ?
२. तात्याचे निसर्गावर प्रेम होते हे कोणकोणत्या गोष्टींवरून दिसून येते ?
३. तात्याच्या आजारपणाची लोकांनी का चेष्टा केली ?
४. तात्याबद्दल तुम्हांला काय वाटते ते दहा ओळींत लिहा.
५. वाक्यांत उपयोग करा :
वेडगळपणा, हळहळणे, कळवळणे, हातवारे करणे, कोलमडणे.





## .७.
# विदर्भाचे नंदनवन
### शरच्चंद्र टोंगो

**शरच्चंद्र टोंगो** (जन्म : १९२६.) हे यवतमाळ येथे अमोलचंद महाविद्यालयात मराठीचे प्राध्यापक असून कादंबरीकार व कथाकार म्हणून मराठी वाचकांना परिचित आहेत. 'स्वीकार', 'प्रत्यय', 'चढउतार' या त्यांच्या कादंबऱ्या व इतरही अनेक पुस्तके प्रसिद्ध आहेत.

चौथीच्या बालभारती पुस्तकात माथेरान हा पाठ तुम्ही वाचला आहे ना? अशाच आणखी एका थंड हवेच्या ठिकाणाचा परिचय तुम्हांला या पाठात होणार आहे. काश्मीर हे जसे भारताचे नंदनवन, तसेच 'चिखलदरा' हे विदर्भाचे नंदनवन! सातपुड्याच्या कुशीत वसलेल्या या निसर्गरम्य स्थळाचा येथे परिचय तर करून घ्याच, पण कधी संधी मिळाली तर या सुंदर स्थळाला भेटही दया.

अमरावती ते चिखलदरा हा फार तर शंभर कि.मी.चा प्रवास आहे. वैशाख महिना असला तरी या चिखलदऱ्यात उन्हाचा त्रास मुळीच नाही. वर्षभराचा शीणभाग घालवून ताजेतवाने व्हावे म्हणून उन्हाळ्यात आपण या नंदनवनात येतो. नंदनवन? होय! सातपुडा पर्वताच्या कुशीत वसलेले चिखलदरा हे विदर्भाचे नंदनवनच आहे. या चिखलदऱ्यात आता आपण मनमुराद भटकू या. येथे आपण कितीही फिरलो तरी थकवा येत नाही. चला तर मग!

चिखलदरा हे नाव या गावाला कसे पडले माहीत आहे का?

कौरव-पांडवांची कथा तुम्हांला माहीतच आहे. पांडव द्यूतात सर्वस्व हरले. त्यासाठी त्यांना बारा वर्षांचा वनवास आणि एक वर्षाचा अज्ञातवास भोगावा लागला. त्यातही अट अशी होती, की अज्ञातवासाच्या एका वर्षात पांडवांना कोणी ओळखलेच तर परत बारा वर्षांचा वनवास नि एक वर्षाचा अज्ञातवास भोगावा लागणार होता! म्हणून पांडवांनी अज्ञातवासाचा काळ विराटनगरीत



काढायचा निश्चय केला. ही विराटनगरी येथून सुमारे दहा कि. मी. अंतरावर आहे. सातपुड्याच्या या परिसरातील सर्वांत उंच शिखराचे नाव वैराट. हे नाव विराट राजाच्या नावावरून पडले आहे.

या विराटनगरीचा राजा विराट हा एक भला मनुष्य होता. विराटाचा मेहुणा कीचक हा त्याचा सेनापती होता. तो अत्यंत दुष्ट होता. या परिसरात भीमाचे व त्याचे एकदा द्वंद्वयुद्ध झाले. त्यात कीचक मारला गेला. त्याचे प्रेत भीमाने एका दरीत फेकून दिले व कीचकाच्या पापी रक्ताने विटाळलेले आपले हात त्याने एका कुंडात धुतले. कीचकाला दरीत फेकून दिले म्हणून या स्थानाला पूर्वी कीचकदरा असे म्हणत. हल्ली याला चिखलदरा असे म्हणतात. भीमाने ज्या कुंडात हात धुतले ते कुंड 'भीमकुंड' या नावाने आजही ओळखले जाते.

येथे ऊन अजिबात जाणवत नाही. हवा कशी झुळझुळ वाहते! समुद्र-सपाटीपासून हे स्थान सुमारे बाराशे मीटर उंचीवर आहे. नयनरम्य वनश्रीने

नटलेल्या या ठिकाणी कितीतरी आजारी लोक हवापालट करण्याकरता येऊन राहतात.

वसंत ऋतूत तर चिखलदऱ्याची वनश्री, पानाफुलांनी कशी नटलेली असते पाहा! साग, सालई, तिवस, चार या झाडांनी इथले घनदाट अरण्य कसे बहरून आलेले असते. रंगीबेरंगी फुलांनी डवरलेल्या रायमुनींची घनदाट अरण्येही येथे आहेत. याशिवाय येथे बचनागाची बने आहेत. बांबूची बेटे आहेत. हे पाहा सुगंध उधळणारे तिखाडीचे गवत. या गवतापासून सेसा नावाचे तेल काढतात.

या रानात वाघ, चित्ते, रानडुकरे, रानम्हशी, हरणे, ससे इत्यादी प्राणी आढळतात. अरण्य घनदाट असूनही पक्षी मात्र फारच कमी प्रमाणात आढळून येतात. याला कारण येथे पडणारा मुसळधार पाऊस. रानात नाग, धामण, अजगर ही 'जनावरे'ही दिसतात.

समोर किल्ला दिसतो ना? तो 'गाविलगड'चा किल्ला. चिखलदऱ्याहून तो फार तर दोन कि. मी. अंतरावर आहे. हा किल्ला इ. स. १३२५च्या सुमारास बांधला असावा. तो पूर्वी गवळी राजांच्या ताब्यात होता म्हणून त्याला 'गवळीगड' असे म्हणत. यालाच आता 'गाविलगड' असे म्हणतात. कविवर्य 'बी' यांना या किल्ल्याविषयी कविता लिहिण्याची स्फूर्ती झाली. त्यांनी 'गाविलगड' ही कविता लिहायला घेतली होती; पण दुर्दैवाने त्यांची ही कविता अपूर्ण राहिली.

चिखलदऱ्याची दोन मुख्य आकर्षणे म्हणजे एक गाविलगड आणि दुसरे कॉफीचे बगिचे. येथील सरकारी बगिच्यांत काय नाही? आंबा, केळी, जांब, बकुळ, निलगिरी, अशोक, नारळ, बदाम, अक्रोड अशी नाना प्रकारची झाडे आहेत. पण येथील प्रमुख उत्पन्न आहे कॉफीचे.

चिखलदऱ्याच्या पोस्टापासून वैराटपर्यंत चालत जाण्यात मोठी मौज वाटते. त्या रस्त्याने काही ठिकाणांवरून चिखलदऱ्याचे सृष्टिसौंदर्य पाहून आपण थक्क होतो. अशा ठिकाणांना 'पॉइंट' म्हणतात. या रस्त्यावर भीमकुंड, देवी, मोजरी, हरिकेन, लाँग प्रॉस्पेक्ट इत्यादी महत्त्वाचे पॉइंटस् आहेत. ही पाहा, अवतीभवती

किती छोटी छोटी गावे आहेत. ही चिमणी चिमणी गावे कोरकूंची आहेत. कोरकू हे या भागातील आदिवासी. कोरकूंची जमात भटकी आहे. जमिनीवरून हे लोक समोरासमोर वाघाची शिकार सहज करतात. मचाणावरून वाघाची शिकार करणे ते कमीपणाचे समजतात.

कोरकूंच्या भाषेला कोरकू हेच नाव आहे. 'कोरकू' या शब्दाचा अर्थ माणसे असा आहे. कोरकूंच्या चिमण्या गावात एक पुजारी असतो. त्याला 'भूमका' असे म्हणतात. त्याच्या तंत्राने सारा गाव चालतो.

या जमातीतील स्त्रियांना रुंद काठाचे लुगडे विशेष आवडते. पुरुषांना कोशा फेटा फार आवडतो. त्यावर ते फुलांचे तुरे खोवतात.

सातपुड्याच्या कुशीत वसलेल्या या निसर्गरमणीय चिखलदऱ्याच्या परिसरातील माणसे ही अशी आहेत. कविवर्य वामन नारायण देशपांडे यांनी कोरकूंच्या जीवनावर 'कोरकू' या नावाचे अतिशय सुंदर काव्य लिहिले आहे.

आता मात्र परतायला हवे. सायंकाळ केव्हा झाली हे आपल्या ध्यानातच आले नाही. आपल्या निवासस्थानी पोचेपर्यंत काळोख गच्च भरेल. मग कोरकूंच्या झोपड्यांत शेकोट्या पेटतील आणि त्यांच्या नृत्यसंगीताने सारे वातावरण कसे दुमदुमून जाईल !

**अभ्यास :**

१. सातपुड्याच्या परिसरातील सर्वांत उंच शिखर कोणते ? ते नाव कशावरून पडले ?
२. चिखलदऱ्याची प्रमुख आकर्षणे कोणती ? त्यांच्याबद्दल कोणती विशेष माहिती दिली आहे ?
३. कोरकूंच्या जीवनाविषयी तुम्हांला कोणती माहिती मिळते ?
४. चिखलदऱ्याच्या निसर्गशोभेचे वर्णन करणारी वाक्ये शोधा व ती लिहून काढा.
५. नंदनवन, अज्ञातवास, निसर्गरम्य—हे सर्व जोडशब्द आहेत. त्यांची फोड करा.
६. तुम्ही पाहिलेल्या एका निसर्गरम्य स्थळाचे दहा-बारा वाक्यांत वर्णन करा.





.८.

# वर्षाराणीचे विमान

## कावेरी कर्वे

**कावेरी कर्वे** (जन्म–१९०६.) 'गुलाबराणी', 'निसर्गगीत', 'जावईबापू' ही यांची लहान मुलांसाठी लिहिलेली पुस्तके प्रसिद्ध आहेत.

'वर्षाराणीचे विमान' या पाठात त्यांनी फुलपाखराची जन्मकहाणी गोष्टीरूपाने सांगितली आहे.

वर्षाराणी व शारदा या दोघी मैत्रिणी. एकदा त्या बोलत बसल्या होत्या. बराच वेळ त्यांच्या गप्पा चालल्या होत्या. वर्षाराणी आपल्या बागेचे रसभरीत वर्णन करत होती—"शारदा, माझ्या बागेत खूपच खूप फुले आहेत. आणि बरं का, कितीतरी रंगीबेरंगी विमानं तिथं सारखी उडत असतात."

वर्षाराणीच्या बागेचे वर्णन ऐकून शारदेला आनंद झाला. ती वर्षाराणीला म्हणाली, "वर्षाराणी, माझ्याकडं पाठव ना ग तुझ्याकडची ती विमानं. किती मज्जा होईल! पाठवशील का ग?"

"हो. जरूर पाठवीन हं. बरं, जाते बाई आता मी. खूपच उशीर झाला. तुझ्याकडं विमानं पाठवायची आहेत ना?"

वर्षाराणी आपल्या बागेत गेली. शारदा मोठ्या आतुरतेने वर्षाराणीच्या विमानांची वाट पाहात राहिली.

त्यानंतर पुष्कळ दिवस गेले. आकाशात ढग जमले. पाऊस पडू लागला. एकदा शारदा घराच्या दारात उभी होती. इतक्यात एक फुलपाखरू तिच्याजवळ आले आणि लगेच पाठोपाठ कितीतरी छोटी छोटी पाखरे तिच्याभोवती भिरभिरू लागली! ती पाहताच शारदेला वर्षाराणीच्या बोलण्याची आठवण झाली. 'वर्षाराणीचीच विमानं ही' ती स्वतःशीच पुटपुटली. इतक्यात एक पाखरू

तिच्याशी बोलू लागले. म्हणाले, "शारदाताई, आम्हांला वर्षाराणीनं धाडलं आहे."

"होय? मग या ना. माझ्या बागेत राहाल?" शारदेने विचारले.

"हो. अवश्य राहू."

वर्षाराणीची चिमुकली विमाने शारदेच्या बागेत भिरभिरू लागली. शारदा त्या भिरभिरत्या विमानांकडे एकसारखी पाहात बसायची. असेच काही दिवस गेले आणि—

आणि एके दिवशी ती पाखरे दिसेनाशी झाली. पण गंमत अशी, की ती जिथे जिथे बसत त्या त्या झाडांवर, पानांवर, दगडांवर पांढरे खसखशीएवढाले कण मात्र ओळीने चिकटलेले दिसत होते. शारदा अस्वस्थ झाली. तिने त्या फुलपाखरांचा खूप शोध घेतला. एके ठिकाणी मात्र चार–दोन पाखरे तिला स्वस्थ बसलेली आढळली. त्यांच्याही अंगांतून तसेच पांढरे कण बाहेर पडताना दिसत होते. ते पाहून शारदेला भारीच वाईट वाटले. तिला वर्षाराणीचा रागही आला. ती स्वतःशीच म्हणाली, "वर्षाराणीनं मला फसवलं. खोटारडी कुठली! पळवून नेली माझ्याकडची विमानं. ही दोनचार भिक्कारडी विमानं तेवढी ठेवली माझ्याकडं. ही तर धड उडतसुद्‌धा नाहीत. शी! यांना काय विमानं म्हणायची?"

शारदा फणकाऱ्याने घरात गेली. पण त्या विमानांचा विचार मात्र तिला काही स्वस्थ बसू देईना. वर्षाराणीची विमाने गेली आणि त्याऐवजी खस-खशीच्या दाण्यांसारखे हे मागे काय राहिले?

शारदेचे कुतूहल जागे झाले. ती त्या इवलाल्या कणांकडेच पाहात राहिली. तिला आता तोच एक छंद जडला. असा एक आठवडा गेला. आणि त्यानंतर एक चमत्कार घडला. त्या इवलाल्या कणांतून बारीक बारीक केसाळ प्राणी बाहेर पडले. ते बागेत जिकडे तिकडे हिंडू लागले. त्यांपैकी एकाला शारदेने सहज गमतीने हात लावला. अन् काय! त्या इवलाल्या जिवांच्या अंगावरचे काटेच तिच्या बोटांना टोचले. ती रागाने म्हणाली, "दुष्ट कुठचे! माझ्या बोटांना काटे बोचले ना?"

शारदेच्या तोंडचे ते शब्द ऐकताच त्यांपैकी काही जीव म्हणाले, "शारदाताई, आम्ही काही दुष्ट नाही. इवलासा आमचा जीव. त्याला कोणी इजा करू नये, म्हणून देवानं आम्हांला दिले आहेत हे काटे. कशाला हात लावलात तुम्ही आम्हांला?"

"म्हणे देवानं दिले आहेत काटे? वा रे वा! कोण रे तुम्ही?"

"आम्हांला सुरवंट म्हणतात."

"म्हणे आम्ही सुरवंट. आहाहा रे सुरवंट!" असे म्हणतच ती रागाने घरात निघून गेली.

यानंतर तर तिने बागेत जाण्याचेही टाळले. असेच काही दिवस गेले, पण पुढे तिला घरात-देखील स्वस्थ बसवेना. एके दिवशी ती बागेत गेली आणि पाहते तो काय! सुरवंटांनी बागेतील झाडांचे पानन्‌पान खाऊन टाकले होते. छान छान वेली विद्रूप झाल्या होत्या. बागेची ही नासधूस पाहून शारदेला दुःख झाले. या सुरवंटांचा ससेमिरा केव्हा एकदाचा सुटेल असे तिला होऊन गेले!



असेच काही दिवस गेले. आणि एके दिवशी ते सुरवंट बागेतून पार नाहीसे झाले. हे पाहून शारदेला आनंद झाला. पण ते सुरवंट एकाएकी असे कसे नाहीसे झाले?

आता हाच विचार तिच्या मनात ठाण मांडून बसला. रोज ती बागेत हिंडायची आणि कुठे एखादा सुरवंट दिसतो की काय हे पाहायची. पण छे! एकही सुरवंट तिच्या दृष्टीस पडेना. त्या सुरवंटांऐवजी एक नवीन गोष्ट मात्र तिला बागेत आढळली. झाडांच्या फांद्याफांद्यांवर इवलाली, छोटी छोटी,

नाजूक घरटी तिला दिसू लागली. काही तांदळाएवढी, काही पोह्यासारखी, तर काही त्याहून जरा मोठी. काही पानांची, काही काट्यांची, तर काही मातीचीही! शारदा त्या घरट्यांकडे घटकाभर पाहातच राहिली. तिने ती आपल्या आईलाही दाखवली. 'ते कोष आहेत' असे आईने तिला सांगितले. शारदेला त्यांचे मोठे नवलच वाटले. आता त्या कोषांकडे बघत बसण्याचा एक नवाच छंद तिला जडला. जवळ जवळ महिना दीड महिना तिचा हाच क्रम चालू होता. एके दिवशी अशीच ती एका कोषाकडे एकटक बघत बसली होती. तोच तिच्या कानावर शब्द आले, "दार उघडा, दार!"

शारदेला आश्चर्य वाटले. तिच्या मनात विचार आला — हे सुरवंटच या घरट्यात लपून बसलेले असावेत. नक्की तेच दिसतात — आणि मग ती म्हणाली, "कशाला रे दार उघडायचं? तुम्हांला झाडांची पानं खाऊ द्यायला?"

"नाही, नाही."

"मग लोकांना काटे टोचायला?"

"उघड की दार. मी वर्षाराणीचं विमान आहे."

"चल, थापा मारू नकोस. खोटं बोलत असलास तर चिरडून टाकीन! आहे कबूल?"

"हो, कबूल."

शारदेने हळूच त्या घरट्याचे दार उघडले. आणि खरंच आतून एक सुंदर फुलपाखरू सुळकन बाहेर आले. शारदेच्या अवतीभोवती ते नाचू लागले. त्याच्या मखमली पिवळ्या अंगावर लाल, निळे ठिपके फारच खुलून दिसत होते. ते फुलपाखरू सारखे हालत होते, नाचत होते, उडत होते, तरंगत होते. आता या फुलावर, तर क्षणात त्या पानावर, तर लगेच शारदेच्या अंगावर. त्याचे वळ्यावळ्यांचे अंग रेशमासारखे चमकत होते. आणि त्याच्या लांब मिशा तरी किती नाजूक नि लवलवत्या होत्या! उडता उडता ते फुलपाखरू म्हणाले, "शारदाताई, चल ना लवकर, मला वर्षाराणीनं पाठवलं आहे."

इतक्यात तशीच कितीतरी विमाने बागेत उडू लागली. एक–दोन–पाच,



मोजणार तरी किती ? घरघर नाही, खरखर नाही; धुराचे फवारे नाहीत, की कसला आवाज नाही. आणि रंग किती मोहक ! प्रत्येकाचा वेगळा. ते पाहून शारदा अगदी वेडावून गेली. ती आनंदाने नाचू लागली. तिने मैत्रिणींना हाक मारली, " चला ग, चला लवकर, वर्षाराणीची विमानं आली आहेत. इवली इवली विमानं. रंगीबेरंगी विमानं. हलती–झुलती विमानं. उडती–फिरती विमानं. चला भरभर. माझ्या वर्षाराणीनं भेट पाठवली हो. कित्ती कित्ती चांगली आहे माझी वर्षाराणी !"



**अभ्यास :**

१. वर्षाराणीची विमाने कोणती होती?

२. वर्षाराणीची विमाने मागे काय ठेवून गेली?

३. शारदेने बागेत जायचे का टाळले?

४. शारदेने आईला कोणते नवल दाखवले?

५. कोषातून बाहेर पडलेल्या फुलपाखराचे वर्णन करा.

६. फुलपाखराच्या जीवनातल्या चार अवस्था कोणत्या?

७. ससेमिरा सुटणे, ठाण मांडून बसणे व वेडावून जाणे या वाक्प्रचारांचा वाक्यांत उपयोग करा.





## ९.

# फुलांच्या जगात

## वा. शि. आपटे

**प्रा. वा. शि. आपटे** (जन्म : १९१६.) यांची अनेक पुस्तके प्रसिद्ध आहेत. हा पाठ त्यांच्या 'गजरा मोतियांचा' या पुस्तकातून घेतला आहे.

ज्याला फुले आवडत नाहीत असा माणूस शोधूनही सापडणार नाही. आणि या जगात देवाने फुले तरी किती प्रकारची निर्माण केली आहेत! अशा या फुलांच्या जगात जाऊ या. एक भुंगा तेथील फुलांचा परिचय करून देत आहे.

कोण आहे ते? आलो, आलो हं–अरे हो, पण थांबा; थांबा हं जरा. मी आत अडकून पडलो आहे. कडी काही निघत नाही. दार काही उघडत नाही. मग बाहेर कसा येऊ?

त्याचं काय झालं सांगू का?

काल संध्याकाळची गोष्ट. रमतगमत या इथं आलो आणि या ठिकाणी मधुसेवनात असा काही गुंग होऊन गेलो, की भानच राहिलं नाही–स्थळाचं आणि काळाचंदेखील. सूर्य केव्हा मावळला, कळलंच नाही. या कमळाच्या पाकळ्या अलगद मिटल्या आणि मी आत अडकून पडलो. मोठमोठ्या मत्त हत्तींना जेरीला आणणारा मी! कठीण काष्ठांचा पोखरून क्षणार्धात भुगा करणारा मी! या कोवळ्या कमलिनीच्या पाकळ्या उलगडू शकत नाही. रात्रभर अडकून पडलो. विचार करतो आहे—रात्र संपेल; सुप्रभात होईल; पुन्हा सोनेरी किरणं सरोवरावर नाचतील; कमळ फुलेल आणि मी पटकन बाहेर पडेन.

काय? झाली म्हणता सकाळ? कुणाची चाहूल आहे ही? पारिजातकाची? हो, एवढ्या पहाटे उमलण्याची त्याचीच सवय. इथं जवळपास नसेल तो

कदाचित. परंतु त्याच्या फुलांचा सडा जणू माझ्या अगदी जवळ पडल्यासारखा वाटतो आहे. त्याचा सुगंधच सांगतो आहे ते !

हा दुरून येणारा मंद गंध केवड्याचा. त्याच्या सुगंधाचा प्रभाव नागराजांवर पडत असेल, परंतु मला भीती वाटते त्याच्या अंगावरच्या काट्यांची. शिवाय मला हवा मध. तो तर त्याच्याजवळ मुळीच नाही !

इथं कसा मधुर मकरंद आहे. आणि शीतल परागांची शय्या आहे ! अरे, सकाळ झाली वाटतं. वा ! वा ! काय छान ! किती मनोहर, केवढं सुंदर जग आहे हे ! ही हिरवी शेतं आणि त्यांच्या कडेला फुललेली तरवड, तेरडा, तीळ, झेंडू यांची पिवळी फुलं. हिरव्या साडीची ही पिवळी किनारच जणू !

ज्या सरोवरांतल्या कमळात मी राहिलो होतो ना, ते पाहा किती छान दिसतं आहे. कमळाच्या गोल वर्तुळाकार पानांनी ते झाकलं आहे. त्या सरोवराकडं पाहिलं, की वाटतं निसर्गसुंदरीच्या कपाळावर कुणी हिरवी टिकलीच गोंदली आहे ! आणि त्या तिकडं पाहा. एका झाडातून लाल जास्वंदाचे फूल वर डोकावून पाहात आहे. लाल तुऱ्याचा कोंबडा पहाटेची बांग तर देत नसेल ? झऱ्याचं पाणी झुळझुळ वाहतं आहे, त्याचा आवाज येतो आहे. असं वाटतं, की जलराणीने पायांत चाळ बांधलेले आहेत !



आलो, आलो म्हणतो ना! एवढी कसली घाई? आपल्याला नाही बुवा असली घाई चालायची. ती पाहा कारंजी. पाण्याची नाहीत ती. फसलात ना? पांढरी शुभ्र लिलीची फुलं आपले तुरे नाचवताहेत! या इथल्या एका कोपऱ्यात फुलांचा ताटवा आहे. पलीकडं गुलाबी डेलियाच्या फुलांची एक सरळ रांग दिसते. शेताच्या आणि झऱ्याच्या आजूबाजूला रानशेवंतीचे पिवळे मळे तर अगदी फुलले आहेत!

ज्या सरोवरातून मी आलो तिकडं पुन्हा पाहा. ते बगळे नाहीत बरं का, पांढरी कमळं दिसताहेत. माना वर करून पाहाताहेत. ही पाहा, इकडं एक फुलवेल सूर्यनारायणाला वंदन करण्यासाठी वाकली आहे. पलीकडं ती गुलाबवेल पाहा कशी डौलात उभी आहे; पाहा, पाहा तर खरं. तिनं आपल्या डोक्यावर सोनेरी, टपोर फूल कसं अलगद तिरकस खोचलं आहे. लाजलाजून एवढीशी झालेली ही लाजरी फुलं ह्या इथं पाहा. पण त्यांच्याकडे पुन्हा पुन्हा पाहू नका, दृष्ट लागेल हो त्यांना!

या फुलांशी, त्या फुलांशी जरा गप्पागोष्टी करू या का? विचारू का त्यांची सुखदुःखं त्यांना? साधीभोळी, निष्पाप फुलं ती! काय सांगतील, आहे ठाऊक? कुणी म्हणेल, 'मला मुलींच्या वेणींत फुलायचंय.' तर कुणी म्हणेल, 'मला वीरांचे पाय पुजू दे.' आणखी कुणी म्हणतील, 'आम्हांला प्रभूच्या गळ्यातील हार होऊ दे.'



ही गोकर्णी, मधुमालती, कोन्हांटी—अगदी साधीभोळी फुलं. रूप साधं, वास साधा. ही अबोली—न बोलता किती किती सांगते ती!

थांबा, थांबा. आठवण राहावी म्हणून ही बकुळीची फुलं घेऊन जा. ती सुकली तरी त्यांचा सुवास दरवळतच राहतो. या सहलीची आठवण अशीच राहायला हवी, नाही का?





अभ्यास :

१. भुंगा कुठे अडकून पडला होता? त्याला सकाळपर्यंत बाहेर का पडता आले नाही?
२. फुलांच्या जगात कोणकोणती फुले भेटली?
३. प्रत्यक्ष न पाहताही भुंग्याने काही फुले कशी ओळखली?
४. कोणत्याही पाच फुलांची नावे लिहून त्यांच्या सौंदर्याचे वर्णन करणारी काही वाक्ये प्रत्येक फुलाच्या नावापुढे लिहा.
५. सहलीची आठवण राहावी म्हणून बकुळीचीच फुले का दिली? अशीच आणखी कोणती फुले देता येतील?





# .१०.
# एका बालवीराची रोजनिशी

## अ. वि. जोशी

अ. वि. जोशी (जन्म : १९२२) हे परभणी जिल्ह्यात साहाय्यक जिल्हा स्काउट कमिशनर आहेत. इथे दिलेल्या 'एका बालवीराची रोजनिशी' हा पाठ त्यांनी लिहिला आहे.

या रोजनिशीवरून बालवीराच्या दैनंदिन जीवनाची ओझरती ओळख होऊ शकेल व त्या जीवनाचे तुम्हांलाही आकर्षण वाटेल अशी अपेक्षा आहे.

शुक्रवार, ४–१०–१९६८

आमच्या पथकातील निवडक अशा बालवीरांचा संघ ६ ऑक्टोबर ६८ ला औरंगाबादला भरणाऱ्या मेळाव्यासाठी जाणार आहे. त्यासाठी माझी पण निवड झाली आहे.

शिबिराला जायला मिळणार या आनंदातच मी घरी निघालो होतो. वाटेत एके ठिकाणी खूप गर्दी जमली होती. एका सायकलस्वाराने एका मुलाला धडक दिली होती. रस्त्यावर पडलेला तो मुलगा रडत होता. मी त्याचा हात धरून त्याला उभे केले. त्याच्या गुढग्याला चांगलाच मार बसला होता; रक्तही वाहात होते. जवळच असलेल्या डॉ. काळ्यांच्या दवाखान्यात मी त्याला नेले. तिथे त्याची जखम धुऊन पट्टी बांधली. नंतर मी त्याला घरी पोचवले. आज एक सत्कृत्य केल्याचा मला आनंद झाला.

शनिवार, ५–१०–६८

आज दुपारी दोन वाजता आमचा प्रवास सुरू झाला. आम्ही सर्व जण एकाच डब्यात बसलो होतो. गाणी, गोष्टी, हास्यविनोद यांची लयलूट होती. औरंगाबाद केव्हा आले हे आम्हांला कळलेसुद्धा नाही. संध्याकाळचे सात वाजले होते. स्टेशनवर उतरताच तिथल्या बालवीरांनी आम्हांला स्टेशनाबाहेर

उभ्या असलेल्या बसकडे नेले. आमचे सर्व सामान बसमध्ये ठेवायलाही त्यांनी मदत केली. पंधरा मिनिटांत आम्ही सोनेरी महालासमोर पोचलो. तेथेच आमचा मेळावा भरणार होता. तेथे आम्ही आमचा तंबू उभारला.

रविवार, ६-१०-६८

आजचा दिवस अगदी नावीन्यपूर्ण वाटला. सकाळी ठीक साडेसात वाजता बिगुल झाला. उठल्याबरोबर तंबूच्या बाहेर आलो; तो काय! केवढे सुंदर दृश्य आमच्यासमोर उभे राहिले! इकडे सोनेरी महालापलीकडे डोंगरांची अर्धगोलाकृती रांग उभी होती. तिकडे ताजमहालासारखा दिसणारा बिबीचा मकबरा उभा होता. जिकडेतिकडे पाचूसारखे हिरवेगार दिसत होते. निसर्गरम्य परिसरात आम्ही जमलो होतो. आमचा उत्साह वाढला. व्यायाम, सफाई, न्याहारी आटोपून आम्ही आमचा गणवेश चढवला. आठ वाजता मेळाव्याच्या अधिकाऱ्यांनी सर्व तंबूंची पाहाणी केली. मेळाव्यास आलेले अडीचशे बालवीर व वीरबाला ठीक



साडेआठला एकत्र जमले. महाराष्ट्राच्या निरनिराळ्या जिल्ह्यांतून आलेले बालवीर व वीरबाला यांचा हा मेळावा होता.

ध्वजवंदन झाल्यावर दोन तास अनेक प्रकारच्या चढाओढी झाल्या. काठ्यांचा पूल तयार करणे व उघड्यावर विस्तव पेटवणे या चढाओढीत आमचा संघ पहिला आला. नंतर आम्ही कपडे धुतले, स्नान आटोपले व स्वयंपाकाला लागलो. जेवणे उरकून सर्वांनी थोडा वेळ विश्रांती घेतली.

दुपारी अडीच वाजता मुख्य पाहुणे आले. आम्ही त्यांना मानवंदना दिली. त्यांच्या हस्ते शिबिराचे उद्‌घाटन झाले. शिबिराची एकंदर व्यवस्था पाहून त्यांनी समाधान व्यक्त केले.

रात्री साडेआठ वाजता शेकोटीच्या कार्यक्रमासाठी आम्ही एकत्र जमलो. सर्वांनी शेकोटीच्या धगधगत्या ज्वालां भोवती उभे राहून शेकोटी-गीत म्हटले. पोवाडे, नकला, संवाद, गाणी असे करमणुकीचे विविध कार्यक्रम झाले. मोठी मौज आली !

सोमवार, ७-१०-६८

आजच्या चढाओढींना काही वेगळाच रंग आला. होकायंत्राचा उपयोग करणे, कमीतकमी वेळेत अन्न शिजवणे, स्काऊट-चालीने अंतर कापणे, रोगी वाहून नेणे, त्यांच्या जखमांवर पट्ट्या बांधणे या चढाओढींत सर्व पथकांनी भाग घेतला होता. त्याच वेळी वीरबालांच्या पण चढाओढी सुरू होत्या. चढाओढी संपल्या आणि आम्ही मेळाव्याच्या आवाराबाहेर पडलो.

माग काढण्याचा खेळ नंतर सुरू झाला. खुणांवरून माग काढत काढत आम्ही डोंगरावरून पुढे पुढे जात होतो. या खेळात मोठी मौज वाटली.

मौज अशी की आज रात्री झालेल्या शेकोटीच्या कार्यक्रमात पाहुण्यांनीही भाग घेतला होता.

मंगळवार, ८-१०-६८

आज समारोपाचा दिवस. जगातील सर्व बालवीरांचे प्रमुख सर चार्ल्‌स् मॅक्लीन ह्यांनी आमच्या मेळाव्याला भेट दिली.

लॉर्ड बेडन पॉवेल हे बालवीर चळवळीचे जनक. सर चार्लस् मॅक्लीन हे त्यांचे सहकारी. सर चार्लस् यांनी जगभर प्रवास केला होता. भाषा, धर्म, देश जरी भिन्न असले तरी स्काऊटध्वजाखाली सर्व बालवीर व वीरबाला एकदिलाने जमतात, असे त्यांनी आपल्या भाषणात सांगितले. बालवीरांनी आपले सत्कार्याचे व सेवेचे व्रत अखंड पाळावे, असा संदेश त्यांनी दिला.

उद्या अजिंठा व वेरूळ येथील लेणी पाहून आम्ही घरी परतणार.

**अभ्यास :**

१. मेळाव्याला जाण्यापूर्वी बालवीराने कोणते सत्कृत्य केले ?

२. शेकोटीच्या कार्यक्रमासंबंधी थोडक्यात माहिती द्या.

३. शिबिरात बालवीरांनी कोणकोणती कामे केली ?

४. सर चार्लस् मॅक्लीन यांनी आपल्या भाषणात बालवीरांना काय सांगितले ?

५. माहिती मिळवा :
बालवीराची प्रतिज्ञा, लॉर्ड बेडन पॉवेल, बालवीराचा गणवेष.

६. सकाळी उठल्यापासून रात्री झोपेपर्यंत एक दिवसाची तुमची दैनंदिनी लिहा.





## ११.

# परमवीर अब्दुल हमीद

ग. प्र. प्रधान

**प्रा. ग. प्र. प्रधान** (जन्म इ. स. १९२२.) शिक्षण एम्. ए. विद्यार्थिदशेपासून साहित्याची आणि समाजसेवेची आवड. पुणे विद्यापीठ विधिसभेचे व कार्यकारिणीचे अनेक वर्षे सदस्य. महाराष्ट्र विधान परिषदेचे सदस्य. त्यांची अनेक पुस्तके प्रसिद्ध आहेत.

शौर्याच्या अनेक कथा तुम्ही वाचल्या असतील. त्या वाचताना तुमच्या अंगावर रोमांचही उभे राहिले असतील. केवळ काल्पनिक कथांनीही आपण भारावून जातो. इथे दिली आहे ती तर एक सत्यकथा आहे! आपल्या देशासाठी प्राणाची पर्वा न करता शौर्याने वीराचे मरण पत्करणाऱ्या अब्दुल हमीदच्या महापराक्रमाचे वर्णन पुढील कथेत वाचा. तुमचीही छाती अभिमानाने भरून येईल!

भारतात आजवर मी खूप प्रवास केला होता. पण रणभूमी पाहण्याची मात्र हीच पहिली वेळ होती. भारत–पाक युद्धाच्या वार्ता मी रेडिओवरून ऐकल्या होत्या. वर्तमानपत्रांतून वर्णने वाचली होती. पण प्रत्यक्ष रणकंदन जेथे झाले तेथे हिंडताना पूर्वी जे मी ऐकले आणि जे वाचले त्यापेक्षा कितीतरी मोठे घडले होते, याची कल्पना थोड्या वेळातच आली.

पंजाबच्या सरहद्दीवरील खेमकरण भागात भारतीय सैन्यातील एक अधिकारी मेजर पुरी यांच्याबरोबर मी फिरत होतो. सुमारे चाळीस फुटांचा रस्ता आणि दोन्ही बाजूंना शेते किंवा खेडेगावची घरे असा हा मुलूख होता. रणगाड्यांमुळे रस्ता जागोजागी उखडला होता. वाटेतले दोन छोटे पूल उद्ध्वस्त झाले होते. काही ठिकाणी तोफांचे गोळे उडून घरे साफ पडली होती. हे सर्व दाखवून मेजर पुरी मला म्हणाले, "या भागात गोळामारी चालली असताना चारी दिशांना

आग लागल्यासारखं वाटत होतं. स्फोटांच्या आवाजानं कानठळ्या बसत होत्या. विमानं घरघरत होती आणि यामुळं देहभान हरपून आपले सैनिक लढत होते. जो पडला त्याच्यासाठी कोणी थांबत नव्हता. मरणालाही कोणी भीत नव्हता. शत्रूवर मुसंडी मारून पुढं जायचं या निर्धारानं भारतीय सैनिक पुढं घुसले होते..."

आणि आता आमच्या जीपच्या भोवताली जिकडे पाहावे तिकडे मोडलेले रणगाडे दिसत होते. आमची जीप एका राहुटीजवळ थांबली. एका लष्करी अधिकाऱ्याने हसतमुखाने आमचे स्वागत केले. मेजर पुरी मला म्हणाले, "आता त्यांच्याच तोंडून ऐका तुम्ही इथल्या युद्धाची कहाणी."

तो उंचापुरा शीख अधिकारी मला सांगू लागला, "पाकिस्तानला अमेरिकेनं पॅटन रणगाडे पुरवले होते. हे रणगाडे अजिंक्य आहेत असं पाकिस्तानला वाटत होतं. ही प्रचंड धुडं पाहून आमच्याही छातीत प्रथम धडक भरली. पण अब्दुल हमीदसारखे वीर आपल्याकडं होते. आम्ही धुव्वा उडवला त्या रणगाड्यांचा आणि पाकिस्तानी सेनेचा!"

"अब्दुल हमीद म्हणजे परमवीर चक्र मिळालेलाच ना?" मी विचारले.

"हो, तोच." मेजर पुरी म्हणाले.

तो शीख अधिकारी पुढे सांगू लागला, "माझ्याच तुकडीत होता अब्दुल हमीद—उत्तर प्रदेशातंला राहणारा. शाळेत असल्यापासून मोठा धाडसी होता. सैन्यात जायचं ही त्याची महत्त्वाकांक्षा होती. आणि जेव्हा त्याला सैन्यात प्रवेश



मिळाला तेव्हा तो मित्रांना म्हणाला, 'आता मला खरा पराक्रम करायला मिळेल.' 'उगाच बकवा करू नकोस. अद्याप लढाई पाहिलीही नाहीस.' एक मित्र थट्टेने म्हणाला. हमीद गप्प बसला. पण त्याचे हात मात्र शिवशिवत होते. आमच्या तुकडीत तो सर्वांना प्यार होता. तो मोठा खिलाडू आणि दिलदार वृत्तीचा होता. ज्या वेळी आम्हांला आगेकूच करण्याचा हुकूम मिळाला तेव्हा हमीदचा उत्साह शिगेला पोहोचला. आमच्यातल्या काही जणांना प्रथम वाटलं, अब्दुल हमीद कसा काय लढेल ? पण हमीदच्या डोळ्यांत पाहिल्यावर ही शंका विरून गेली. त्याचा साधा सरळ स्वभाव त्याच्या भाबड्या डोळ्यांत दिसत असे. मायभूमीवरून शत्रूला पिटाळून लावायचं एवढंच स्वप्न त्याला दिसत होतं. त्यात तो अगदी बेहोष होता.'' जरा थांबून त्या शीख अधिकाऱ्याने एका जागेकडे बोट दाखवले आणि म्हणाला, ''त्याच जागेवर अब्दुल हमीद आपल्या तुकडीला घेऊन सज्ज होता आणि सुसाट वेगानं पाकिस्तानचे प्रचंड पॅटन रणगाडे आले. आपली पहिली प्रतिकाराची फळी त्यांनी मोडून काढली आणि ते पुढं घुसणार तोच अब्दुल हमीद जोशात आपल्या सैनिकांना हुकूम देत होता, 'आगे बढो ! सीर नीचे. फायर !' पण तो नुसता हुकूमच देत नव्हता. दुर्बिणीनं त्या यमदूतांना तो न्याहाळत होता आणि एक रणगाडा समोर येत असताना अब्दुल हमीदनं नेमका हँडग्रेनेड त्यावर फेकला. त्या हँडग्रेनेडमुळं त्या टँकला एकदम आगच लागली. हमीद पुढं सरकला आणि दुसऱ्या पॅटन रणगाड्यावर त्यानं जवळचा दुसरा हँडग्रेनेड टाकला. खर्र् खट् असा आवाज करून ते धूड बंद पडलं आणि लगेच भारतीय जवान त्यातील सैनिकांवर तुटून पडले. अब्दुल हमीदच्या पराक्रमामुळें आपल्या सैनिकांना विलक्षण स्फुरण चढलं आणि ते शत्रूवर मारा करू लागले.

''एक पाकिस्तानी अधिकारी ओरडत होता, 'सैतान ! सैतान !'–होय, अब्दुल हमीद त्याला सैतानासारखा वाटत होता. आमचा हमीद आता दमला होता. पण थांबायला उसंत होती कुठं ? चारी बाजूंना पाकिस्तानी रणगाडे आग ओकत होते. हमीदनं उजव्या बाजूच्या रणगाड्यावर तिसरा हँडग्रेनेड टाकला

आणि आकाश भेदून जाईल असा स्फोट झाला. त्या रणगाड्यावरील पाकिस्तानी सैनिक ठार झाले. 'भारतमाता की जय!' आपले सैनिक रणगर्जना करत होते. आणि इतक्यात दोन गोळ्या सूं-सूं करत हमीदच्या अंगात घुसल्या. तिसरी गोळी नेमकी छातीत घुसली आणि अब्दुल हमीद जमिनीवर कोसळला."

तो शीख अधिकारी गंभीर झाला होता. क्षणभर त्याने खालचा ओठ आवळून धरला आणि तो म्हणाला, "अब्दुल हमीद अमर झाला. मरणानंतर त्याला 'परमवीरचक्र' देण्यात आले. भारतमातेचा खरा सुपुत्र!"

अब्दुल हमीदला विसावा देणाऱ्या त्या रणभूमीकडे मी भक्तिभावाने पाहिले आणि माझे मस्तक आदराने त्या वीरापुढे लवले.

राहुटी–छोटा तंबू; बकवा–बडबड, निर्धार–निश्चय, हँडग्रेनेड–हातबॉंब.

**अभ्यास :**

१. या पाठात कोणत्या युद्धातील कहाणी सांगितली आहे?
२. हमीदला केव्हा विशेष आनंद झाला?
३. हमीदने कोणते साहसाचे कार्य केले? त्याचा कोणता परिणाम झाला?
४. भारत सरकारने हमीदचा गौरव कसा केला?
५. उद्ध्वस्त, जोश, गोळामारी, रणकंदन, मेजर, फायर या शब्दांचे अर्थ समजावून घ्या.
६. खालील वाक्प्रचारांचे अर्थ समजावून घ्या :
धुव्वा उडवणे, हात शिवशिवणे, शिगेला पोहोचणे, फळी मोडून काढणे.
७. या पाठातील युद्धाचे वर्णन तुमच्या शब्दांत लिहा.





.१२.

# गोट्याची दिवाळी

**ना. धों. ताम्हनकर**

**ना. धों. ताम्हनकर** (जन्म : १८९३ मृत्यू : १९६१.) 'किर्लोस्कर' मासिकाचे सहसंपादक म्हणून बरीच वर्षे काम केले. त्यांनी जवळजवळ पन्नास पुस्तके लिहिली आहेत. पुढे दिलेला उतारा त्यांच्या 'गोट्या' या पुस्तकातून घेतला आहे.

दिवाळी म्हणजे आनंद! दिवाळी म्हणजे फराळाची चंगळ! होय ना? पण 'गोट्या' नावाच्या एका कल्पक मुलाने अशाच एका दिवाळीत काय केले, हे पुढील उताऱ्यात वाचा व तुम्हांलाही असे काही करावेसे वाटते का, पाहा.

दिवाळी सुरू झाली. पहाटे सर्वांची स्नाने वेळीच उरकली आणि फराळाची तयारी सुरू झाली. गोट्या सुमास हाक मारून म्हणाला, "सुमाताई, केव्हा निघायचं ग?"

"मी वाटेल तेव्हा तयार आहे यायला." सुमा म्हणाली.

"कुठं स्वारी व्हायची आहे तुमची?" मी विचारले.

"आहे आपली आमची एक गंमत." असे म्हणून सुमा गोट्याकडे पाहून हसू लागली.

फराळाआधीच मुले बाहेर उधळतील या भयाने ती म्हणाली, "इतक्यात नाही हं कुणी बाहेर जायचं. ही मी मांडलीच पानं. फराळ होऊ देत आणि मग जा कुणाला कुठं जायचं ते."

तिची ही ताकीद ऐकून दोघेही बावरलेली दिसली. त्यांनी गोंधळलेल्या चेहऱ्यांनी एकमेकांकडे पाहिले. काही खुणाही केल्या एकमेकांना. अखेर थोडा धीर करून आवंढे गिळीत गोट्या म्हणाला, "वैनी, आम्हांला फराळ नकोय आज."

"म्हणजे? ह्याचा रे काय अर्थ? सोन्यासारखी दिवाळी आणि म्हणे फराळ नको!"

"खरंच नको ना वैनी आम्हांला फराळ." सुमा म्हणाली.

शेवटी मी तडजोडीचा मार्ग सुचवला—"हे बघा रे पोरांनो, तिच्या सांगण्याप्रमाणं साऱ्या गोष्टी व्हायला पाहिजेत. तुम्हांला पाहिजे तेवढंच खायचं. इतकं खाल्लंच पाहिजे असा आग्रह तिनं तुम्हांला करायचा नाही. झालं की नाही मग ? हं, आणा फराळाची ताटं."

आमची फराळाची पंगत बसली. माझे ताट रिकामे होत आले व ती दुसरे वाढप घेऊन आली. पण मुलांची पाने जशीच्या तशीच असल्याचे पाहून ती रागाने म्हणाली, "ही रे काय तुमची दळभद्री लक्षणं ? रोज खायला खायला म्हणून ओरडता ! अन् आज सोन्यासारखे जिन्नस पुढं वाढलेत तर तुमची तोंडं शिवलेली आहेत जशी काही !"

"पण वैनी, तुम्ही आग्रह करायचा नाही असं ठरलंय आधीच !"

"ठरू दे, मोठा आलाय मला शहाणपण शिकवायला ! हं, आटपा झटपट तुमचं. हे झाल्यावर मी दूध आणणार आहे."

"ते घेतो आम्ही वैनी, पण फराळाचा आग्रह नका करू. दुपारी खूप जेवायचंय.....मला आवडतात म्हणून पाकातल्या पुऱ्या करणार आहात ना आज ?" गोट्या तिची समजूत घालू लागला.

"अन् वैनी, आम्हांला त्या लाडू-करंज्या नि चकल्या-चिरोटे आज नको असले तरी पुन्हा हवेत."

खाऊ एकदा नको म्हणून तो पुन्हा पाहिजे असे सुमा म्हणाली; त्याने माझी उत्सुकता मात्र वाढली. त्यांनी छपवून ठेवलेल्या आपल्या जमतीशी ह्या गोष्टीचा काहीतरी संबंध असणार हे मी ओळखले आणि पाहू तरी मुले काय करताहेत ते, असे म्हणून मीही स्वस्थ राहिलो.

दिवाळीचे चारही दिवस आम्ही मुलांबरोबर खूप मजेत घालवले. आम्ही पत्ते, सोंगट्या वगैरे खेळ खूप खेळलो. फराळाच्या बाबतीत मुलांची उदासीनता सोडली आणि फटाक्यांवर त्यांनी घातलेला बहिष्कार वगळला, तर इतर सर्व मुलांप्रमाणेच गोट्या-सुमा दिवाळीच्या आनंदात पूर्णपणे रंगून गेली होती, असे म्हणायला हरकत नाही.



आम्ही घरचा भाऊबीजेचा समारंभ दुपारीच उरकून घेतला. कारण संध्याकाळी मला माझ्या मावसबहिणीकडे जायचे होते. सुमाने गोट्याला ओवाळले. दरवर्षीप्रमाणे ती गोट्याच्या हातात ओवळणीसाठी दोन रुपये देऊ लागली तेव्हा गोट्या म्हणाला, "नको आहेत मला ते रुपये. मी यंदा पाच रुपयांची ओवाळणी घालणार सुमाताईला. माझ्यापाशी आहेत. आमचे विद्याधर गुरुजी लेख लिहितात ना ? त्यांच्या लेखांच्या नकला करण्याचं काम त्यांनी मला सांगितलं. नकला केल्याबद्दल त्यांनी मला पाच रुपये दिले."

गोट्या स्वतःच्या कमाईची ओवाळणी सुमाला घालणार ह्याचे आम्हांला केवढे कौतुक वाटले ! विद्याधर गुरुजींबद्दल आदर वाटला. कारण काम करून कमाई करण्याचे वळण त्यांनी आपल्या शिष्याला लावले होते.

ओवाळणी आणि जेवणाचा समारंभ उरकला. पाच रुपये हातात घेऊन सुमा नुसती नाचत होती !

अमळशाने सुमा-गोट्या दोघेही बाहेर गेली आणि मी वामकुक्षीसाठी पलंगावर आडवा झालो. माझे लक्ष सहज भिंतीकडे गेले व मला मुंगळ्यांची एक रांगच्या रांग वरून खाली उतरताना दिसली. त्यांचा ठावठिकाणा शोधून काढल्यावाचून मला राहवेना. शोधान्ती मला दिसून आले, की माजघराच्या माळ्यावरून हे लुटारू मुंगळे येत आहेत. पण माळ्यावर तरी त्यांनी कशावर डल्ला मारला आहे ? शिडी लावून मी माळ्यावर गेलो. मला तेथे काय दिसले ?

धान्याच्या रिकाम्या डब्यांत लाडू, अनारसे, करंज्या असे दिवाळीच्या फराळाचे डबे भरलेले. फराळाचे इतके जिन्नस ! आणि ते ठेवायला अशी

अडचणीची जागा. तिलाही हा प्रकार पाहून माझ्याइतकेच नवल वाटले. हे पोरांचे काम आहे हे सहज कळण्यासारखे होते. पण त्यांनी हा खटाटोप कसा आणि कशासाठी केला ह्याचा उलगडा ती आल्याशिवाय कसा होणार होता?

पाच वाजून गेले. दोन गरीब मुले आमच्याकडे आली. ती कोण आणि कशासाठी आली आहेत ह्याची मी चौकशी करत असता आणखी काही मुले आली. पंधराएक मिनिटांत तीसचाळीस मुलांमुलींचा जमाव आमच्या इथे जमला. आम्ही उभयता नुसती आश्चर्य करीत पाहात राहिलो होतो.

थोड्याच वेळात कसलीतरी दोन पुडकी घेऊन गोट्या-सुमा आली. त्यांच्या-बरोबर विद्याधर गुरुजीही होते. आणि मग आम्हांला सर्व प्रकाराचा उलगडा झाला.

जमलेली मुले म्हणजे गोट्या-सुमाचे गरीब खेळगडी. "तू दिवाळीत काय काय जमती करतेस, तुझ्या आईनं फराळचं काय काय केलंय?" असे सुमाने आपल्या एका गरीब मुलीस शाळेत विचारले. त्या वेळी "सुमाताई, फराळाचे म्हंजे काय? दिवाळीतसुद्धा चटणी-भाकरच खातो आम्ही." असे तिने उत्तर दिले. सुमाला भारी वाईट वाटले आणि ही आपल्या मनाची रुखरुख गोट्याला सांगून ती म्हणाली, "आपल्यासारखी दिवाळी त्यांना का मिळू नये रे?"

ह्या प्रश्नाचे उत्तर गोट्याला एकदम सुचेना. पण ते त्याला विद्याधर गुरुजींच्या लेखांची नक्कल करताना मिळाले. त्यांच्या लेखात एक वाक्य असे होते—'श्रीमंत लोक जरुरीपेक्षा अधिक खर्च करतात, तर गरिबांना पोटापुरतंही उरत नाही. सर्वांनीच गरजेपुरतं घेण्याची दृष्टी ठेवली तर सर्वांना समाधान मिळेल.'

गोट्याला वाटले—खरेच, आम्ही घरोघर जे फराळाचे पदार्थ करतो ते जरुरीपेक्षा कितीतरी अधिक असतात. मुष्टिफंड म्हणून मूठभर धान्य गोळा करून कित्येक संस्था चालवतात. आपणही लाडूकरंज्यांचा असाच मुष्टिफंड जमवला तर आपले पुष्कळ गरीब खेळगडी पोटभर फराळ करतील.

मनात विचार आल्यावर तो अमलात आणायला गोट्याला वेळ लागत नसे. सुमाला त्याची कल्पना पटली आणि दिवाळी सुरू होताच गावात सुखवस्तू लोकांच्या घरोघरी फिरून दोघांनी खाद्यपदार्थांचे सहासात डबे जमवले.

विद्याधर गुरुजींच्या अध्यक्षतेखाली त्यांच्या खेळगड्यांचा उपाहारसमारंभ आमच्या घरी साजरा झाला. सुमाने आपल्या भाऊबिजेच्या पाच रुपयांच्या वह्या-पेन्सिली आणून त्यांना वाटल्या. समारंभ उरकल्यावर ती म्हणाली, "तू एवढा खटाटोप केलास, त्यापेक्षा मला सांगितलं असतंस तर मी एकटीनंच केला असता की एवढा बेत."

"पण वैनी, श्रीमंत लोकांची गैरसोय न होताही गरिबांच्या समाधानाची सोय होते—गुरुजींच्या या म्हणण्याचा पडताळा पाहायचा होता मला. ह्या माझ्या मुष्टिफंडानं खरं ठरलं नाही का ते?"

गोट्या ह्या वेळी किती समाधानाने हसला. त्याच्या डोळ्यांतील चमक पाहताना आम्हांला दिवाळीचा खरा आल्हाद वाटत होता.

दळभद्री – कमनशिबी, वामकुक्षी – दुपारच्या जेवणानंतरची झोप.

**अभ्यास :**

१. गोट्या-सुमाने दिवाळीचा फराळ का केला नाही?

२. गोट्याने सुमाला ओवाळणीसाठी पाच रुपये कोठून आणले?

३. तिने त्या ओवाळणीच्या पैशांचे काय केले?

४. मुष्टिफंड म्हणजे काय ते समजावून घ्या. मुष्टिफंडाची कल्पना गोट्या-सुमाने कोणत्या रीतीने अमलात आणली?

५. खालील शब्दांची फोड करा :

विद्याधर, उपाहार, शोधान्ती, खेळगडी, भाऊबीज, माजघर.

६. 'आमची दिवाळी' यावर तीन परिच्छेद लिहा.





# .१३.

# मासाहेब, जरा ऐका !

## रणजित देसाई

**रणजित देसाई :** (जन्म १९२८.) विद्यार्थिदशेतच त्यांनी लेखनाला प्रारंभ केला. कथाकार व कादंबरीकार म्हणून ते महाराष्ट्राला परिचित आहेतच.

पुढील नाट्याचा उतारा श्री. रणजित देसाई यांच्या 'श्रीमान योगी' या कादंबरीतील एका कथाभागावर आधारित आहे. बादशहाच्या कैदेतून सुटल्यानंतर श्री छत्रपती शिवाजी-महाराजांना वेशांतर करून कशी खडतर वाटचाल करावी लागली व बाळराजे संभाजी यांच्या सुरक्षिततेसाठी कशी कल्पकता योजावी लागली याचे एक ओझरते दर्शन इथे घडते. पण एवढ्याशा कथाभागावरूनही स्वराज्यसंस्थापक श्री छत्रपती शिवाजीमहाराजांना ज्या दिव्यातून जावे लागले असेल त्याची न सांगताही कल्पना येते.

### प्रवेश पहिला

(खेड्यातील पाटलाचे घर. ओसरीवर पाटील, कल्याण, आनंद वगैरे बसले आहेत. पाटील त्यांना खायला शेंगा देतात.)

**पाटील :** घ्या महाराज !

**कल्याण :** तुमचं नाव काय ?

**पाटील :** रावजी पाटील म्हंत्यात मला.

**एक शिष्य :** तुम्ही पाटील आहात ?

**पाटील :** महाराज, घराण्याची पाटिलकी होती. मोगलाई गेली. आता पाटील हे नाव तेवढं मागं ऱ्हायलंय, पण पोट भरायची पंचाईत.

**आनंद :** ती पाळी जास्त दिवस राहायची नाही.

**पाटील :** आँ !

कल्याण : पाटील, आमचा आनंद भविष्य चांगलं जाणतो. त्याचे बोल खोटे व्हायचे नाहीत.

पाटील : (आनंदाचे पाय धरत) आनंदजी, गरिबाचं कल्याण होईल. तुमच्या तोंडात साखर पडो.

(पाटलाची बायको आतून येते व वैराग्यांच्या हातांवर भाजी-भाकरी ठेवते.)

आनंद : आई, तुमचं कल्याण होवो!

पाटलीणबाई : बाबांनो, हाती घास आला तो आपला गप खावा. राखलं असतं तर दोन गोड घास घातलं असतं. पण त्यो शिवाजी हाय न्हवं? त्यो गोड घास कसा गिळू देनार?

आनंद : काय केलं शिवाजीनं?

पाटलीणबाई : आता मोगलाईत आमी सापडलो. त्यो काय आमचा गुन्हा व्हय? शिवाजी राजाचं सरदार त्ये पर्तापराव, आनंदराव, तेलंगराव! त्यांनी आख्या मोगलाईत धुमाकूळ घातलाय. गावंच्या गावं लुटली. बादशानं पकडलं हुतं म्हनं शिवाजीला. तिथंच त्यो मेला असता, तर बरं झालं असतं! पण सुटला.

कल्याण : काय म्हणता! शिवाजी सुटला?

पाटील : म्हंजे, तुम्हांला ठावं न्हाई?

दुसरा शिष्य : आम्ही बैरागी! शिवाजीची चौकशी कशाला करतो?

पाटलीण : अवं, शिवाजी राजा सुटला एवडंच न्हवं तर गडावर पोचला बी! गडावर तोफा धडाडल्या की!

आनंद : असं! काय पाटील, आई म्हणतात ते खरं का?

पाटील : अवो, तिचं काय ऐकता! परड्यातलं लाकूड गेलं तरी सा म्हैने कळकळणारी ही बायकांची जात! आता वाळ्ळ्याबरोबर वल्लं बी जरा जळायचंच! नका ध्यान देऊ तिच्या बोलण्याकडं. निवांत झोपा आता महाराज! आमी बी जरा पडतो.

## प्रवेश दुसरा

(रस्ता : बैरागी जात आहेत. प्रतापराव व सैनिक घोड्यांवरून येतात.)

प्रतापराव : (बैराग्यांना नमस्कार करत) बैरागी ! आपण कोण देशीचे ?

कल्याण : आम्ही काशीचे बैरागी !

प्रतापराव : मग दक्षिणेत बरे उतरलात ?

आनंद : (कुबडीशी चाळा करत) बेटा, बोलून चालून आम्ही बैरागी. परमेश्वराच्या धरतीवर फिरायला बंदी कसली ?

प्रतापराव : महाराज, एक संकट आहे. ते टळेल का ? आपण सांगू शकाल ?

कल्याण : बेटा, तो योग मला नाही. पण हा आनंद आहे ना, त्याला हा योग आहे. तो भूत-भविष्य जाणतो. तू त्याला विचार.

प्रतापराव : (आनंदाला हात जोडीत) महाराज, कृपा व्हावी !

आनंद : बेटा ! संकट काय आहे ?



प्रतापराव : (जरा साशंक होऊन) महाराज, खरोखरच आपण भूत–भविष्य जाणता ना ?

आनंद : अरे, संशय कसला ? आमची परीक्षा करतोस ! मग ऐक तर, सांगू तुझं नाव ? तू ना ? 'प्रतापराव' ही राजानं लावलेली उपाधी ! आज तुझ्या हाताखाली हजार स्वार मला दिसतात. तू सेनापती आहेस. आणि ऐक, तुझा राजा अद्यापि गडावर आलेला नाही. तो गडावर पोहोचला हे साफ खोटं आहे. तुझा राजा तुला भेटेल का, हे तुला विचारायचं होतं ना ?

प्रतापराव : धन्य महाराज ! (आनंदाच्या पाया पडतो.) महाराज, चूक झाली. क्षमा व्हावी ! आमचे राजे अद्याप गडावर आले नाहीत. त्याच चिंतेत आम्ही आहोत.

आनंद : बेटा, चिंता करू नकोस ! तुझा राजा सुखरूप आहे.

प्रतापराव : सुखरूप आहेत ! पण भेटतील केव्हा ?

आनंद : अरे, अगदी नजीकच्या काळात. ह्याच सप्ताहात ! ह्याच सप्ताहात तू राजाचे पाय शिवत असलेला मला दिसतो आहेस.

प्रतापराव : महाराज, तसं झालं तर स्वर्गाला माझे हात लागतील ! (आपल्या हातातल्या सोन्याच्या कड्याकडे पाहात.) महाराज, आपलं भविष्य खरं ठरलं, तर खुद्द राजांनी आपल्या हातांनी या हातांत घातलेलं कडं मी तुमच्या हाती घालीन.

आनंद : त्यात आम्हांलाही आनंदच आहे.

प्रतापराव : पण महाराज, आपला मुक्काम कुठं ?

आनंद : (हात उंचावतात) बेटा, चिंता करू नकोस, तुझी राजाशी भेट होईल तेव्हा मी तिथंच असेन. (प्रतापराव व इतर सैनिक बैराग्यांना वंदन करून जातात.)

### प्रवेश तिसरा

(जिजाबाई देवघरात देवपूजा करत आहेत.)

जिजाबाई : कोण, मोरोपंत ? का आलात बाबा ?

मोरोपंत : मासाहेब, दारी चार बैरागी आलेत. आपलं दर्शन मागतात.



जिजाबाई : जा बाबा, त्यांची समजूत घाल. सारं करून थकले मी. अभिषेक झाले, अनुष्ठानं झाली, दानधर्म झाला पण माझा शिवबा मला दिसत नाही. मला आता कोणाला भेटायची इच्छा नाही. जा, त्यांना हवी ती भिक्षा घाल. (मोरोपंत हात जोडून जातो. पुन्हा परत येतो.)

मोरोपंत : मासाहेब ते भिक्षा स्वीकारायला तयार नाहीत. त्यांना आपलं दर्शन हवं आहे. त्याशिवाय ते जागचे हालत नाहीत.

जिजाबाई : (देवाला नमस्कार करत) बैरागीसुद्धा हट्टी बनावेत ना? येते बाबा! आता कुणाचे शाप नकोत मला. (जिजाबाईचा तोल जातो. मोरोपंत त्यांना सावरतात.) आताशा तोल जातो बघ.

मोरोपंत : मासाहेब, वय झालं. उपास सोसत नाहीत.

जिजाबाई : मग मरण का रे येत नाही ? (स्वतःशीच) कुठं भटकत असेल पोर ? शिवबा मोठा आहे. सारं सोशील तो. पण जीव तुटतो तो त्या कोवळ्या पोरासाठी.

मोरोपंत : मासाहेब, बैराग्यांना भेटून थोडा वेळ पुढच्या महालात यावं.

जिजाबाई : का रे ?

मोरोपंत : सारे गोळा झालेत. काहीतरी ठरवायला हवं.

जिजाबाई : बरं (मोरोपंत जातात.)

### प्रवेश चौथा

(जिजाबाईंना पाहताच आनंद बैरागी त्यांच्या पायांवर मस्तक ठेवतो.)

जिजाबाई : (मागे सरून) अरे ! आजवर थोडे का अपशकून झाले ! बैरागी कधी पाया पडतो का ?

शिवाजी : मासाहेब, तुम्ही आम्हांस ओळखत नाही ?

जिजाबाई : (आनंदातिशयाने मिठी मारत) शिवबा !

शिवाजी : मासाहेब बसावं. जरा शांत व्हा. मग खूप बोलू.

जिजाबाई : (डोळयांतील आनंदाश्रू पुसत) शिवबा ! शंकराची उपासना करत होते ना ? अगदी त्या रूपात प्रगटलास !

(महाराज जिजाबाईंसह महालाबाहेर येतात. त्यांना पाहून सर्व जण अगदी आश्चर्याने थक्क होतात. लवून मुजरा करतात.)

प्रतापराव : महाराज ? आपण....?

शिवबा : हो ! मीच तो ! आम्ही सांगितलं होतं ना ? जेव्हा तुमचे राजे प्रकट होतील तेव्हा आम्ही तुमच्याजवळ असू. पण प्रतापराव, तुम्ही आमचे सेनापती. निदान तुम्ही तरी आम्हांला ओळखायला हवं होतं. (प्रतापराव ओशाळतात...प्रतापराव, आनंदराव, तेलंगराव, धनाजी, बाळाजी, मोरोपंत यांच्यावरून महाराज प्रेमाने व कृतज्ञतेने नजर फिरवतात. प्रतापरावांच्या खांद्यावर हात ठेवत) तुमचे अनंत उपकार आमच्या राज्यावर आहेत. आम्ही शत्रुघरी सापडलो. कैद झालो. अनेक मास लोटले तरी राज्याची घडी एवढीही विघडू दिली

नाहीत. एवढंच नव्हे तर आम्ही नसताना आमचं कार्य चालू ठेवलंत, हे तुमचे उपकार कधी फिटायचे नाहीत. मोरोपंत, धनाजी, तुमची एवढी ताकद असली तर राज्य उभारणीला माझीही गरज लागणार नाही.

(महाराज आपले अश्रूंनी भरलेले डोळे पुसतात.)

धनाजी : महाराज, बाळराजे कुठं आहेत ?

शिवाजी : नको तो प्रश्न विचारलात ! (डोळे मिटून) बाळराजांचा काळ झाला. बाळराजे आम्हांस सोडून गेले. (जिजाबाईकडे पाहून) मासाहेब !

जिजाबाई : (टाहो फोडून) बाळराजे ! मला टाकून कसे गेलात ? कुणी परवानगी दिली ?

शिवाजी : (जिजाबाईंना समजावत) मासाहेब, आमचं जरा ऐका.

जिजाबाई : (महाराजांचा हात झिडकारत) काय राजे, नको ते ऐकलं ! आणखीन काय ऐकू ? थोरामोठ्यांच्या राजकारणात हकनाक माझं पोर घालवलंत ! राजे, निदान त्या सईला दिलेल्या वचनाची तरी आठवण ठेवायची होती !

शिवाजी : मासाहेब, जरा ऐका ! थोडं देवघरात चला.

जिजाबाई : देवघरात ? आता कोण आहे तिथं तर देवघरात जाऊ ? अरे, माझा बाळकृष्ण गेला ! त्या रित्या गाभाऱ्यासमोर कशाला जाऊ मी ? (महाराज बळेच त्यांचा हात धरून देवघरात नेतात.)

शिवाजी : मासाहेब, जरा ऐका ! मासाहेब, आम्ही तुम्हांला नंतर सांगणारच होतो. पण नाइलाजानं आताच सांगावं लागतं. चिंता नका करू. तुमचे बाळराजे सुखरूप आहेत !

जिजाबाई : (आश्चर्याने व आनंदाने) शिवबा !

शिवाजी : या जगदंबेशपथ ! मार्ग धोक्याचा म्हणून त्यांना मथुरेत ठेवलं आहे. पण जी बातमी आता उठली, तीच कायम टिकवणं हिताचं आहे. आणि बाळराजे शत्रुमुलखातून घरी येईपर्यंत तुम्हीसुद्धा तीत सामील झालं पाहिजे.

जिजाबाई : मी ? राजे !

शिवाजी : ऐका मासाहेब ! जोवर तुमचे बाळराजे तुम्हांला भेटत नाहीत, तोवर आम्ही आमच्या वचनाला बद्ध आहोत. बाळराजांच्या मृत्यूची बातमी आपोआप दिल्लीला जाईल. शोध थांबेल आणि बाळराजे सुरक्षित घरी येतील; तोवर आमच्याही जिवाला स्वस्थता लाभणार नाही.

जिजाबाई : शिवबा, तुझ्या असल्या राजकारणात साध्या माणसाची आतडी तुटतात रे ! (महाराजांना मिठी मारून) शिवबा ! शिवबा !

उपाधी–पदवी, अनुष्ठान–देवासाठी करायची एक विशिष्ट पूजा, हकनाक–विनाकारण, उगीचच, कारण नसताना, कृतज्ञ–उपकारांची जाणीव ठेवणारी व्यक्ती.

अभ्यास :

१. शिवाजीमहाराजांना कोणी अटक केली होती ? त्यांना कुठे ठेवले होते ?
२. तेथून ते कसे सुटले ? महाराष्ट्रात कसे परत आले ?
३. शिवाजीमहाराजांच्या कोणकोणत्या एकनिष्ठ सेवकांचा उल्लेख या पाठात आहे ?
४. शिवाजीमहाराजांना त्यांच्याबद्दल काय वाटत असे ते दाखवणारी वाक्ये शोधा.
५. शिवाजीमहाराजांनी संभाजीला बरोबर का आणले नाही ? त्यांनी संभाजीबद्दल कोणती बातमी पसरवली ? का ?
६. प्रतापराव का ओशाळले ?
७. पाटील या शब्दापासून पाटिलकी हा शब्द तयार होतो. अशा रीतीने तयार होणारे पाच शब्द दया.





## .१४.

# गोदाकाठ

### भगवंत देशमुख

**भगवंत देशमुख** (जन्म : १९२२.) श्री. देशमुख मराठीचे प्राध्यापक असून त्यांनी ललित लेखन केले आहे. 'आलोक' हा त्यांचा लघुनिबंध संग्रह प्रसिद्ध आहे.

काही काही गोष्टी अशा असतात की त्यांची आठवण अपल्याला सतत होत राहते. इथे दिलेल्या पाठात लेखकाने अशाच काही आपल्या आठवणी सांगितल्या आहेत. तुम्हांलाही त्या खचित आवडतील.

अगदी लहानपणापासून गोदाकाठचे मला वेड आहे. माझे गाव गोदावरीच्या काठावर वसलेले आहे. दोन जागी वळणे घेऊन गोदावरी नदी माझ्या गावाच्या तीन बाजूंनी वाहते. जणू दोन्ही हात पसरून तिने माझे गाव प्रेमाने उराशी कवटाळूनच धरले आहे.

आज माझ्या या गावापासून मला दूर राहावे लागते. कित्येक दिवस या आवडत्या गोदाकाठची भेट घेता येत नाही. पण सवड मिळाली की मी आगत्याने गावी येतो तो या गोदाकाठच्या भेटीसाठी.

गावी असलो की नदीकाठी जाण्याचे सुख मला भरपूर घेता येते व मी ते घेतो. सकाळ, दुपार, संध्याकाळ कोणतीही वेळ असो, नदीकाठी जाऊन बसण्यात मला विलक्षण आनंद वाटतो.

सकाळच्या वेळी, पूर्व दिशेने येणारी सूर्याची सोनेरी किरणे सगळीकडे पसरत असतात. मंद वाऱ्याच्या लहरींनी गोदावरीच्या पात्रातील संथ पाण्यावर तरंग उठू लागतात. जणू झोपलेली गोदावरी जागी होऊ लागते. तिच्या लाटांवर सोनेरी सूर्यकिरण खेळू लागतात.

भल्या पहाटे नदीच्या प्रवाहात डुंबण्यात एक निराळीच मौज असते!

काठाला नदीचे पाणी अगदी थंडगार असते. पण प्रवाहाच्या धारेत शिरले, की ते अगदी ऊबदार वाटू लागते. अशा वेळी पाण्यात डुंबताना अंगाखांद्यांवरून रेशमासारखे मऊ पाणी खळखळत असते. लहानपणी आईच्या मांडीवर डोके ठेवून तिच्या प्रेमळ ओव्या ऐकताना जसे वाटायचे, अगदी तसे वाटते अशा वेळी !

गोदाकाठी गेले, की माझ्या मनात अशा अनेक आठवणी जाग्या होतात. आपली जुनी छायाचित्रे पाहून पूर्वीच्या अनेक आठवणी होतात ना ? नदीकाठी गेले की माझीही स्थिती तशीच होते ! माझ्या जीवनातील कितीतरी प्रसंग मला आठवतात. या सगळ्याच आठवणी सुखद असतात असे नाही. आपली जुनी छायाचित्रे आपण जपून का बरे ठेवतो ? ती काय सगळी मोठी चांगली असतात ? माझ्या लहानपणचं एक छायाचित्र माझ्याजवळ आहे. पायांत पुणेरी जोडे, गुडघ्यापर्यंत चड्डी, अंगात मुंजीतली शेरवानी व डोक्यावर जरीची टोपी असा गमतीचा व बावळा वाटणारा पोशाख करून मी उभा आहे, असे त्यात दिसते. पण आजही मला ते छायाचित्र जपून ठेवावेसे वाटते; कारण पुन्हा न येणाऱ्या माझ्या बालपणची ती आठवण आहे.

गोदाकाठ हा तर जणू माझ्या गतायुष्याचा चित्रपटच आहे ! त्याने माझ्या



जीवनातील कितीतरी प्रसंगांची चित्रे जतन करून ठेवली आहेत. त्याच्याजवळ गेले की ही चित्रे मला दिसू लागतात. मात्र ती केवळ माझी मलाच बघता येतात. त्यांचा आनंदही केवळ मलाच लुटता येतो.

हे पाहा त्यांतलेच एक चित्र. एक दहा-अकरा वर्षांचा मुलगा गोदावरीच्या काठावर उभा आहे. त्याच्या बरोबर दोनचार सोबतीही आहेत. पाण्यात आधी कुणी उडी मारावी याविषयी त्यांचा विचार चालू आहे. उडी मारण्यापूर्वीचा तो थंड पाण्याचा स्पर्श म्हणजे अगदी कठीण काम ! पण एकदा उडी मारली, की तेच पाणी किती सुखद वाटते म्हणून सांगू ! अगदी गारठेपर्यंत पाण्यात डुंबायचे व मग काठावरील ऊबदार मऊमऊ वाळूत लोळायचे. त्या वेळचा वाळूचा तो स्पर्श ! त्याचा अनुभव मला आता घेणे शक्य नाही. कुठलाही छायाचित्रकार त्या स्पर्शाचे छायाचित्र घेऊ शकत नाही. तेथे जाताच मला तो अनुभव पुन्हा घेतल्यासारखा वाटतो. ते सुख पुन्हा जाणवते. क्षणभर मी पुन्हा लहान होतो.

हे आणखी एक चित्र बघा. माझ्या जीवनाचे एक नवे पान उलटणारा तो दिवस होता. एम्. ए. च्या परीक्षेत उत्तीर्ण झाल्याचे मला कळले होते. शिक्षण संपले होते. पुढे काय करायचे हे अजून निश्चित होत नव्हते. या मनःस्थितीत असतानाच मी गोदाकाठी येऊन तिथल्या वाळूत पहुडलो होतो. जवळच नदीचा प्रवाह वाहात होता. नुकताच सूर्यास्त झालेला होता. क्षितिजावर निरनिराळ्या रंगांच्या छटा उमटत होत्या. हे दृश्य मी डोळे भरून पाहात होतो. जवळच्या मंदिरातील सनईचे सूर वातावरणात घुमत होते. इतक्यात वरच्या बाजूला काही स्त्रियांनी गोदावरीच्या प्रवाहावर सोडलेले लहान लहान दिवे खाली वाहात येऊ लागले. पाण्यावर काढलेल्या रांगोळीप्रमाणे ते दिवे दिसत होते; हेलकावत हेलकावत दूर जात होते. मनात आले या दिव्यांप्रमाणे जीवनात आपल्याला आनंदी राहाता येईल का ? मी निश्चय केला की पुढे काही का होईना आपण सारा प्रवास याच आनंदी वृत्तीने करायचा. या माझ्या निश्चयाची गोदाकाठी गेल्यावर आजही मला नव्याने जाणीव होते. मन प्रसन्न होते. जगण्यात आनंद वाटू लागतो आणि म्हणूनच गोदाकाठाबद्दल मला अधिक प्रेम, अधिक आदर वाटू लागतो.



अभ्यास :

१. लेखकाला गोदाकाठ का आवडतो?

२. लेखकाने आपल्या जीवनातील कोणकोणत्या आठवणी सांगितल्या आहेत?

३. नदीच्या पात्रातील दिवे पाहून लेखकास काय वाटले?

४. 'गोदाकाठ हा तर जणू माझ्या गतायुष्याचा चित्रपट आहे', असे लेखकाने का म्हटले आहे?

५. 'मंद वाऱ्याच्या लहरींनी गोदावरीच्या पात्रातील संथ पाण्यावर तरंग उठू लागतात. जणू झोपलेली गोदावरी जागी होऊ लागते.' यासारख्या या पाठातील तुम्हांला आवडणाऱ्या इतर कल्पना शोधा.

६. तुमची एखादी गोड आठवण दहा-बारा वाक्यांत लिहा.





## .१५.

# आऊ

## वि. द. घाटे

**वि. द. घाटे** (जन्म १८९५.) शिक्षणतज्ज्ञ व साहित्यिक म्हणून सुप्रसिद्ध आहेत. नाट्यरूप महाराष्ट्र, नाना देशांतील नाना लोक, पांढरे केस हिरवी मने, काही म्हातारे व एक म्हातारी. त्यांची ही व इतरही काही पुस्तके प्रसिद्ध आहेत.

काही माणसे त्यांच्या आचारविचारामुळे चटकन नजरेत भरतात. या पाठातील 'आऊ' ही अशीच एक व्यक्ती आहे. ती खेड्यात राहणारी असली तरी तिचे विचार आणि आचार पाहून कुणालाही अचंबाच वाटेल. अशा ह्या आऊची ओळख करून घेण्यासाठी तुम्हीही अधीर झाला आहात ना?

धुळाप्पाकडे जिरे घातलेले फक्कड ताक पिऊन आम्ही त्यांचा निरोप घेतला आणि वाट चालू लागलो. दुसऱ्याच वळणावर एक म्हातारी आडवी आली. समोर उभी राहिली...आणि चक्क हसली !

मी तिला न्याहाळून पाहिले. वय खूप झाले होते. पण सुरूच्या झाडासारखी ती ताठ उभी होती. केसांच्या अंबाड्या झाल्या होत्या. कोळ्याच्या जाळ्याप्रमाणे तोंडावर नाजूक सुरकुत्यांचे जाळे पसरले होते. अनोळखी म्हातारी रस्ता अडवते काय आणि जणू काय काहीच झाले नाही, काहीच केले नाही, अशा भावाने आमच्याकडे पाहून हसते काय ! पण ते हसणे कसे स्वच्छ आणि मोकळे होते.

म्हातारी आमच्याबरोबर असलेल्या शिक्षकाला हसूनच म्हणाली, "मास्तर, साहेबांना असंच कसं जाऊ देता वो ? अजून आमची बुकं बघायची आहेत ना ! चला घराकडं."

मास्तरांनी खुलासा केला—

"साहेब, ही आमची आऊ. साऱ्या गावाचीच आऊ. हिची मूळची भाषा कानडी. कानडीत आईला आऊ म्हणतात. तिच्या दोन्ही मुली आमच्या

इथंच मुलींच्या शाळेत शिक्षिका आहेत. मुली हिला आऊ म्हणतात. आता सारं गावच तिला आऊ म्हणू लागलं आहे. आऊ स्वतः निरक्षर आहे; पण शिक्षणावर तिची दांडगी श्रद्धा. तिनं आपल्या मुलींना साक्षरतेचे वर्ग काढायला लावले. घरोघर हिंडून ती बायांना गोळा करते. आऊ हिंडते आणि तिच्या मागोमाग तिची सुमन हिंडते. आऊनं आता वाचायला शिकलेल्या बायांसाठी वाचनालय काढलं आहे. आपण ते पाहा आणि सुमा पण पाहा."

मी विचारले, "सुमन कोण ?"

मास्तर हसून म्हणाले, "ती आऊचीच एक मुलगी आहे. भेटेल ती तुम्हांला. चला आपण आऊच्या वाचनालयाला भेट देऊ."

आम्ही बोळात वळलो आणि जवळच्या एका घरात शिरलो. दाराजवळ डाव्या बाजूस लहानशी खोली होती. झाडून सारवून लख्ख केली होती. भिंतीवर शिवाजीमहाराज आणि महात्मा गांधी यांची चित्रे टांगलेली होती. भिंतीशीच एक बसके कपाट होते. आम्ही जाजमावर बसल्यावर आऊने मोठ्या अभिमानाने ते कपाट उघडले आणि त्यातून एकामागून एक लहान लहान पुस्तके काढून माझ्या हाती दिली. किती पण नाजूकपणाने आणि जिव्हाळ्याने!



जणू काय ती तिची लहान लहान बाळेच होती! पुस्तकांना छानदार पुठ्ठे घातले होते. पुस्तके पाहून झाल्यावर आऊने माझ्या हाती एक रजिस्टर दिले. त्या रजिस्टरात वाचनालयातून पुस्तके नेणाऱ्या बायांची नोंद केली होती.

आऊने आमच्यापुढे ताकाचे प्याले आणले. मी हसून विचारले, "ताकच का? लोणीबिणी नाही का?"

आऊने उत्तर दिले, "साहेब, ताक प्यायचं असतं अन् लोणी विकायचं असतं."

मास्तर आऊला सहज म्हणाले, "आऊ, साऱ्या गावाला शिकवतेस, पण तू मात्र अशीच!"

आऊ उसळून म्हणाली, "ते का? आता लिहायची सुरवात केली आहे ना मी."

आऊची मुलगी शेजारीच उभी होती; ती म्हणाली, "होय मास्तर, आऊचा अभ्यास जोरात चालू आहे. तिला आता अक्षरं गिरवण्याशिवाय दुसरं काहीच सुचत नाही. परवा रात्री मोठी गंमत झाली. सांगू का ग आऊ?"

आऊने डोळे वटारले. पण तिकडे न पाहता मुलगी पुढे म्हणाली, "साहेब, ते असं झालं, परवा संध्याकाळी आऊला मी पाटीवर अक्षरं काढून दिली. आऊनं पाटीवर अक्षरं गिरवली. बोटांनी भिंतीवर गिरवली. रस्त्यावरच्या धुळीतसुद्धा गिरवली. तेवढ्यानं तिचं समाधान झालं नाही. रात्री माझ्याजवळच झोपली होती. मध्यरात्री मला जाग आली. कुणीतरी माझ्या तळपायाला गुदगुल्या करत होतं. मी दचकले. पाहते तर आऊ! मी विचारलं, "काय ग आऊ, गुदगुल्या का करतेस अशी?" आऊ थोडी वरमली आणि हसून म्हणाली, "काही नाही ग. कालचे ग म भ न पक्के झाले का नाही ते बघत होते. नीज आपली. आता नाही गिरवत."

आम्ही सारे जण हसलो. मला सुमनची आठवण झाली. मी विचारले, "ते सारं खरं, पण ती सुमन कुठं आहे! तिला भेटवणार होता ना?"

सारे जण परत हसले. मास्तर म्हणाले, "आऊ, जरा तुझ्या सुमनला हाक मार ग."

आऊने खणखणीत आवाज़ात साद घातली—" सुमेऽऽ !"

काही सेकंदांतच एक म्हैस जवळच्या गोठ्यातून बाहेर आली आणि दाराशी उभी राहिली. आऊकडे तोंड करून मोठ्याने 'हुँफ्' असा तिने जाब दिला. आऊ म्हशीजवळ गेली. तिच्या गळ्यात तिने हात घातला. प्रेमाने तिला थोपटले आणि ताटातले एक केळ तिला खाऊ घातले.

मला हा प्रकार समजेना. मास्तर म्हणाले, "साहेब ही आऊची तिसरी मुलगी, हिचं नाव सुमन. पोटच्या मुलीचे लहानपणी लाड केले नसतील, इतके या म्हशीचे लाड चालले आहेत ! पूर्वी आऊ भल्या पहाटेस उठून रतिबाचं दूध आणायला जात असे. त्या बायका आऊवर ओरडायच्या, 'आम्हांला गोठ्यातलं शेणमूत काढावं लागतं. तुला काय त्याचं ? उठलीस की येतेस भांडं घेऊन !' एकदा आऊला राग आला. तिनं लगेच व्यायला झालेली म्हैस विकत घेतली. तिला झाली रेडी, त्याच या सुमाताई.

"सुमनला आऊनं झोपायला गादी तयार केली. लहान होती तेव्हा तर सुमन आऊच्या मांडीवरच निजायची. आता झोपते गादीवर, पण मान मात्र ठेवते आऊच्या मांडीवर. तिला खारीककेळ्यांचा खुराक चालू आहे. सुमनला सारं कळतं. 'सुमे, ये...' म्हणून आऊनं साद घातली की ती लगबग येते, 'बस' म्हटलं की बसते. आऊ जाईल तिकडं तिच्या मागं मागं जाते. आऊ कृष्णेवर निघाली की सुमन चालली मागं. आऊला आता टेकाड उतरून खाली नदीवर जाता येत नाही. ती टेकाडावर उभी राहते आणि सुमनला सांगते, 'जा आता नदीवर ' सुमन मुकाट खाली उतरते. नदीवर जाते, पाणी पिते आणि परत आऊकडं येते. सुमाला परवा रेडी झाली. पण अशी विचित्र म्हैस आहे ! आपल्या रेडीला दूध पाजत नाही, लाथा मारते. उलट आऊ भांडं घेऊन धार काढायला आली की तिच्या आचळातून आपोआप दूध गळू लागतं. आऊनं तिचे मागचे पाय बांधले. आता मुकाट रेडीला पाजते."

मास्तर सुमनची कहाणी सांगत होते. तिकडे सुमनचे लाड चालले होते. शेवटी आऊने 'सुमे, जा गोठ्यात—' असा हुकूम फर्मावला. सुमी गेली.

केसांच्या अंबाड्या झालेल्या त्या म्हातारीकडे कुतूहलाने पाहून मी विचारले "आऊ, तू म्हातारी झालीस. पिकलं पान केव्हा गळून पडेल नेम नाही. काही देवधर्म करतेस की नाही!"

आऊ तोंडात मारून घेऊन ताडकन म्हणाली, "छे बा! त्या भानगडीत मी नाही पडत. मी साऱ्या बायकांना सांगते-कचकून काम करा. लिहावाचायला शिका, चांगली बुकं वाचा, मुलाबाळांना, सुनांना लिहावाचायला शिकवा...."

आऊशी पुष्कळ बोलावे, तिच्याकडून पुष्कळ शिकावे असे मनाला वाटत होते. आऊपाशी एखादातरी दिवस घालवावा, असेही वाटत होते. पण गाडीची वेळ झाली होती. मी मुकाट्याने आऊच्या शेरेबुकात शेरा लिहिला आणि बाहेर पडलो. आऊ मला पोचवायला कृष्णेपर्यंत आली. तिच्या पाठोपाठ सुमन होतीच. मळी उतरून कृष्णेत पाय घालीपर्यंत मी मागे पाहात होतो. टेकाडावर ताठ मान करून आऊ उभी होती आणि तिच्या मागे तिची लाडकी सुमन.

निरक्षर – अक्षरओळख नसलेला, वरमली – लाजली, खुराक – पौष्टिक अन्न, रतीब – खादद्यपेयाचे नियमाने ठरलेले प्रमाण, आचळ – प्राण्याचे स्तन, मुकाट्याने – तक्रार न करता, कचकून – भरपूर, मळी – नदीकाठची सुपीक जमीन.

अभ्यास :

१. आऊने साहेबांना कशासाठी बोलावले?
२. आऊच्या घरी गेल्यावर कोणकोणत्या गोष्टी घडल्या?
३. सुमन कोण होती? तिला आऊने कोणत्या प्रकारे वागवले?
४. आऊचे वर्णन करणारी वाक्ये शोधा.
५. अर्थ सांगा व वाक्यांत उपयोग करा :
केसांच्या अंबाडया होणे, साद घालणे, कचकून काम करणे.
६. आऊच्या स्वभावाबद्दल दहा वाक्ये लिहा.





.१६.

# मी श्रीमंत आहे !

## गो. रा. दोडके

**गो. रा. दोडके** (जन्म : १९१०, मृत्यू : १९६३). लघुनिबंधकार म्हणून ते विशेष प्रसिद्ध होते. यांच्या 'पूर्वस्मृति' या पुस्तकातून हा पाठ घेतला आहे.

आईवडील कष्ट करून आपल्या मुलांना शिकवतात; मोठी करतात. पण अशा शिकलेल्या काही मुलांना आपल्या आईवडिलांचा विसर पडतो. सुगी संपली की पाखरे उडून जातात, तशी त्यांची स्थिती होते. इथे दिलेल्या गोष्टीत काय आढळते, पाहा.

कोर्टातील काम संपवून मी बाहेर पडलो आणि लगेच टांगेवाले माझ्याभोवती गोळा झाले. प्रत्येक जण म्हणायला लागला, "चला साहेब, आपला टांगा आहे." त्यातच एक नव्याने आला व जणू काय मी त्याचे रोजचेच गिऱ्हाईक अशा थाटात बोलू लागला, "आपला टांगा आहे साहेब, चला." घोड्यासमोरचे गवत उचलून टांग्यात टाकीत आणखी एक जण म्हणाला, "टांगा तयार आहे साहेब."

सगळ्यांची गंमत मी बघत होतो. टांग्यातून जायचं नाही, असा आधीच मनाशी मी विचार केला होता. त्यामुळे टांगेवाले भरमसाट पैसे मागतील आणि नाइलाजाने ते आपल्याला द्यावे लागतील अशी भीती नव्हती. टांगेवाले अनेक आणि गिऱ्हाईक मी एकटाच. मी एकाला सहज विचारले, "काय घेशील रे धंतोलीचं ?"

"सव्वा रुपया द्या, साहेब."

"जाऊ द्या. आपल्याला टांगाच नको." असे म्हणून काही न बोलता मी तसाच पुढे चालू लागलो.

पण दोन पावले टाकतो न टाकतो तोच एक टांगा माझ्या उजव्या बाजूला

येऊन उभा राहिला. त्याच वेळी टांगेवाल्याचे शब्द कानी पडले, "बसा साहेब."

"काय घेशील ?"

"आपण जे द्याल ते घेईन."

"नाही, नाही, तू काय घेशील ते आधी सांग."

"आपण द्याल ते घेईन साहेब."

"मला झगडा, तंटा नाही आवडत. घरासमोर हुज्जत नको. चाळीस पैसे देईन मी. पटेल तर चल, नाही तर नको."

"आपण द्याल ते खुशीनं घेईन साहेब. बसा."

मी टांग्यात बसलो. टांगा चालू झाला.

मला नवल वाटले. एका टांगेवाल्याने मला सव्वा रुपया मागितला. गिऱ्हाइकाला अडवूनच धरायचे धोरण ठेवले तर सव्वा रुपया मिळतोही त्यांना. आणि जरी सव्वा रुपया न मिळाला तरी निदान सत्तर-ऐंशी पैशांना तरी कुठे मरण नसते. मग हा टांगेवाला इतक्या थोड्याशा पैशावर यायला कसा तयार झाला? मला याचे आश्चर्य वाटले. मी त्याला सरळच विचारले, "एवढ्या थोड्या पैशात तू माझ्यासारखं गिऱ्हाईक कसं पत्करलंस? साठ–सत्तर पैसे गमावून बसलास तू."

"गोष्ट अशी आहे साहेब, आपण विचारलं म्हणून सांगतो. ह्या महागाईनं भाव तर खूप वाढले. आम्ही वीस-पंचवीस पैशात जिथं जात होतो तिथं आज रुपयाच्या खाली हटणार नाही. बड्या लोकांना अडवलं तर पैसा देतील साहेब, पण राजीखुषीनं नाही. तुम्हांला दिल आहे साहेब. पण तुमची मिळकत बेताचीच असणार. मी हे म्हणतो म्हणून राग मानू नका. जिथं पैसे मिळवायचे तिथं खूप मिळवून घेतो. पण प्रत्येक वेळेला माणसाला आडवावंसं नाही वाटत. आता त्या वकीलसाहेबाकडं पाहा." असे म्हणून त्याने अंगुलिनिर्देश केला. "कोसावर घर आहे. मनात टांगेवाल्यांना शिव्या देत चालले असतील. पैसा चांगला मिळतो त्यांना. पण देण्याची नियत नाही. आपल्याला इच्छा असून देणं जमत नाही, म्हणून मी आलो."

मी त्याचे उत्तर ऐकले; जरा गंमत वाटली. पहिल्यांदा तर रागही आला. म्हातारा उदारपणा दाखवतो आहे. आपल्या मोठेपणाने मला भारण्याचा प्रयत्न करतो आहे. जास्त पैसे माझ्या हातून सुटावे, हाही उद्देश असेल अशा रीतीनं बोलण्यात, असे मला वाटले. पण असेही वाटले, कुणाच्या भलेपणाचा का संशय घ्यावा ! खरोखर त्याचे हे विचार नसतील कशावरून !

टांगेवाल्याने मला विचारले, "किती दिवस झाले आपल्या वकिलीला वकीलसाहेब ?"

"झाली दोन-तीन वर्षं."

"ठीक चालली आहे ना वकिली ?"

"ठीक कशाची ? मिळ्तं पोटापुरतं."

"आपलं लग्न झालंच असेल ?"

"छे ! छे ! अजून लग्न झालं नाही माझं."

"नाही ?" केवढ्या विस्मयाने तो म्हणाला ! आणि पुढे बोलला, "माझ्या मुलाचं लग्न होऊन तर चार वर्षं झाली."

काय करतो आपला मुलगा ?"

"वकील झाला आहे तो. पण फॅक्टरीमध्ये काम करतो."



"अस्सं ! पगार चांगला मिळत असेल ?"

"जी हाँ, पण त्यानं तसलं काम करावं हे मला बरं वाटत नाही."

"मग ?"

"तो साहेब झाला की बस."

"मग यात कठीण काय आहे ? सहज होता येईल त्याला."

"एखाद्या बड्या माणसानं हाताशी धरलं तर ठीक; गरिबाला कोण विचारतो ? या जगात फक्त दोन प्रकारचे लोक आहेत साहेब. अमीर आणि गरीब. माझ्या घराजवळ एक हिंदू पोरगा राही. गरीब होता. मॅट्रिक पास झाला फर्स्ट क्लासात. पण त्याला कोणी मदत केली नाही. त्याचा बापही वारला. पोरगा माझ्या कुशीत पडून हमसाहमशी रडला. माझ्याच मुलाबरोबर शिकला आहे तो. आता तो मलाच बाबा मानतो. फॅक्टरीतच काम करतो तोही. या दुनियेत गरिबांशी कोणी संबंध ठेवत नाही. मग तो हिंदू असो की मुसलमान असो. माझा मुलगा चिंतामणला आपला भाऊच मानतो. माझा पोरगाही भला आहे. शिकला आहे, पैसाही कमावतो. तो कधीकधी मला म्हणतो, 'अब्बाजान, आता सोडा हे काम. सुट्टी द्या टांग्याला. आता विश्रांती घ्या. तुमचा पोरगा आता कमवायला लागला आहे.' पण मी ऐकत नाही त्याचं बोलणं. पोरगा आपल्यापरी ठीकच सांगतो. पण टांगा सोडून देऊन मी काय करू ? म्हाताऱ्या जनावराप्रमाणं घरात पडून राहणं तर बरं वाटत नाही. कधी हां म्हणतो कधी ना करतो. पण तोही समजून घेतो."

"बुढेमिय्या, आपण तर आपल्या पोराला खूप चाहता. पोरगा शिकला आहे, वकील झाला आहे. आज पगारही चांगला मिळवतो. असे कित्येक बाप आहेत की जे आपल्या पोरांना वाढवतात, मोठं करतात, त्यांच्यावर पैसा खर्च करतात आणि अशा रीतीने वाढवलेल्या पोरांना पैसा मिळू लागला की त्यांना धुंदी चढते. आपला पोरगा मानतो आपल्याला – की टांगेवाला म्हणून....?"

"जी नही, देवाची दया आहे, अल्लाचा आशीर्वाद आहे. बडा नेक आहे माझा पोरगा. रस्त्याने टांगा हाकत असताना एखादया वेळी तो मला भेटतो. वाटेतच माझी चौकशी करतो. बरोबर दोस्तही असतात. एखादा दोस्त

मधूनच विचारतो, 'काय रे तुझा या टांगेवाल्याशी काय संबंध?' तर माझा पोरगा सांगतो, 'माझे वडील आहेत ते.' माझा मुलगा मला मानतो ही केवढी आनंदाची गोष्ट! मी एक मामुली टांगेवाला; पण श्रीमंताहून श्रीमंत आहे!" हे शब्द बोलत असताना बुढेमियांच्या शब्दाशब्दांमधून अभिमान उचंबळत होता.

घर आले म्हणून मी टांगा थांबवायला सांगितले. खिशातून रुपयाची नोट काढली व मियाजींच्या हातावर ठेवली. साठ पैसे त्यांनी मला परत केले आणि टांगा जागचा हालला. तो दिसेनासा होईपर्यंत मी पाहातच राहिलो.

धंतोली – नागपुरातील एक भाग, नियत – दानत, विस्मय – आश्चर्य, नेक – प्रामाणिक.

अभ्यास :

१. चाळीस पैशात घरी नेण्यास टांगेवाला का तयार झाला?
२. गरीब हाच गरिबाचा सोबती, हे टांगेवाल्याने स्वतःच्या वागण्याने कसे पटवून दिले?
३. टांगेवाल्याचा मुलगा आपल्या वडिलांशी कसे वागत असे? शिकलेल्या मुलांत व टांगेवाल्याच्या या मुलात कोणता फरक आढळतो?
४. 'मी श्रीमंताहून श्रीमंत आहे!'—असे टांगेवाला कोणत्या अर्थाने म्हणाला?
५. नियत नसणे, पैसा कमावणे, नजर चुकवणे, मान फिरवणे, छातीशी कवटाळणे. हमसाहमशी रडणे, अंगुलिनिर्देश करणे—
   या वाक्प्रचारांचा वाक्यांत उपयोग करा.
६. टांगेवाल्याच्या स्वभावाबद्दल दहा ओळी लिहा.



# .१७. नाना

**श्रीधरराव कुलकर्णी**

**डॉ. श्रीधरराव कुलकर्णी** (जन्म : १९१६) हे संत वाङ्मयाचे अभ्यासक म्हणून प्रसिद्ध आहेत. सध्या ते उस्मानिया विद्यापीठात मराठी विभागाचे प्रमुख म्हणून काम पाहतात. 'रंगराव' या टोपण नावाने त्यांनी कथालेखनही केले आहे.

नाना पाटलांचा गावात विलक्षण दरारा होता. लबाडी करणारा कितीही मातबर असला तरी त्याची गय व्हायची नाही. ते ज्यांचे गुमास्ते होते अशा देशमुखांच्या एकुलत्या एका मुलाने एकदा गुन्हा केला आणि मग नानांनी काय केले ते या कथेत वाचा.

नाना काही आमच्या गावचे वतनदार पाटील नव्हते, ते होते साहेबराव देशमुखांचे गुमास्ते. पण गाव त्यांना ओळखत असे ते पोलिसपाटील म्हणूनच.

कल्लेदार मिशा, कोसल्याचा पटका, पायघोळ अंगरखा, कमरेला जाडजूड किल्ल्यांचा जुडगा, हातात नागाच्या तोंडासारखी मूठ असलेली काठी, अशा थाटात चढाऊ जोडा करकर वाजवीत नाना गावातून निघाले, की रस्त्यावरची रहदारी दुतर्फा होऊन रामराम करीत. काही रामराम डोळ्यांनी, काही मानेने, काही काठीची मूठ उंचावून घ्यायचे हा त्यांचा शिरस्ता. मांजराचा वास येताच बिळात जाण्यासाठी उंदरांनी धडपड करावी त्याप्रमाणे चढावाच्या तालावर किल्ल्यांचा आवाज आला, की त्या रस्त्यावर असलेले पारधी कुठंतरी दडत किंवा अदबीने उभे राहात. असा होता नानांचा दरारा!

आवाजही मोठा हुकमी. दूरवरच्या माणसाला हाक घातली आणि तो परतला नाही असे सहसा घडत नसे. 'काय, गावात न्हायचं की नाही?' एवढ्या गिरकीवर कितीतरी प्रश्न जागच्याजागी मिटत. नानांचा शब्द मोडण्याची ताकद कोणातच नव्हती. खरा तो खरा अन् लबाड तो लबाड असा त्यांचा खाक्या.

लबाडी करणारा कितीही मातबर असला तरी त्याची गय व्हायची नाही. तसेच गावच्या येसकराची बाजू खरी असेल तर तो कधी उघडा पडायचा नाही.

पहाटेची चांदणी उगवली की नानांचा दिवस सुरू होई. कोंडवाडा, चावडी, धर्मशाळा, पारध्यांची वसाहत यांना वेढा घालून ते आपल्या शेतावर जात. नाना शेतातून परतू लागले म्हणजे गावाला जाग येई. त्याच वेळी हजेरीची अट असलेला पारध्यांचा तांडा नानांना मुजरा करण्यासाठी वाटेवर उभा राही. नानांची भेदक नजर मुजऱ्याला नसलेला पारधी सहज शोधून काढत असे.

रामा कदम एकदा ढसढसा रडतच नानांच्यासमोर आडवा झाला. त्याची ही अवस्था पाहून नानांनी विचारले, "रडतोस काय असा? नीट बोल की काय झालं ते."

रामाने आपले रडू कसेबसे आवरले. त्याने नानांना सगळी हकीगत सांगितली—साहेबराव देशमुखांचा एकुलता एक मुलगा फकिरा भारी विचित्र होता. यात्रेला जाताना त्याची धमणी कधी सावकाश नाही जायची! त्याच्या धमणीचे बैल कसे अगदी पुष्ट असायचे. त्यांना तो वाटेल ते खाऊ घालीत असे. त्या दिवशी त्याने रामाच्या उभ्या शेतात आपले बैल चरायला सोडले होते. कापणीला आलेले पीक बैलांनी रात्रभर खाऊन फस्त केले होते. तोंडचा घास फकिराने हिसकावून घेतला होता. म्हणून रामा कळवळून रडू लागला.

नानांच्या तळपायाची आग मस्तकाला भिडली. फकिरा आपल्या मित्रांबरोबर निवांतपणे गप्पा मारत मारुतीच्या पारावर बसला होता. नानांना हे कळताच ते तिथे धावून गेले. फकिराला त्यांनी बडवतच गढीखाली नेले. गर्दी खूप जमली. पण नानांचा हात धरणार कोण? ते त्याला धोपटतच राहिले. शेवटी तो निपचित पडला. गर्दीतल्या लोकांना ताकीद देत नाना म्हणाले, "याद राखा कुणी याच्याजवळ जाल तर!" आणि असे म्हणून ते स्वतः घाईने निघून गेले.

नाना परतले ते कानाला दोन टाक लावून व रामोशाच्या डोक्यावर दप्तर देऊन. ते गढी चढून वर गेले. साहेबराव तेथे चिलीम ओढत बसलेले होते. नाना त्यांच्यासमोर दप्तर आदळत म्हणाले, "मालक, सांभाळा तुमचं दप्तर!"



"काय रे, काय झालं, नाना?"

"व्हायचं काय मालक, पाटलाचं कर्तव्य केलं पण हातून पाप घडलं!"

"म्हणतोस काय नाना, येडबीड लागलंय का तुला?"

"पाटिलकीचं येड होतं, डोळ्यांवर धुंदी होती. आता येड गेलं, धुंदी उतरली, डोळे उघडले. दया करा अन् दप्तर सांभाळा." नानांनी दीन मुद्रेने साहेबरावांना विनवले. नानांना एवढ्या केविलवाण्या अवस्थेत कोणीच पाहिले नव्हते.

"अरे, पण सांगशील की नाही काय झालं ते?"

"गढीखाली चला." नाना खाली पाहून बोलले.

दोघेही गढीखाली उतरले. गर्दी पांगली. फकिराच्या तोंडाला फेस आला होता. अंगावर काळेनिळे पट्टे उठले होते.

साहेबरावांनी ओळखले की काहीतरी अनर्थ नक्कीच घडलेला असणार!

ते लगेच ओरडले, "जित्ता है का मेलाय ? फुडच्या तयारीला लागा. पाहात काय बसलात ?"

साहेबरावांनी नानांना मागे ढकलले. नानांच्या हातातली काठी घेतली आणि फकिराच्या अंगावर ते धावले. चपळाई करून नानांनी फकिराच्या अंगावर स्वतःच्या शरीराची कमान केली. साहेबरावांचा काठीचा तडाखा बसला तो नानांच्या बरगड्यांवर.

नानांनी फकिराला मांडीवर घेतले. कोणीतरी पाणी आणलं. नाना फकिराच्या तोंडावर पाणी मारत होते. त्यांचा आक्रोश चालू होता. "लेकरा, म्या–म्या कसाबानं मारलं तुला. माझ्या पोटी पोर नाही रे! पोटच्या पोराची माया कशी उमगणार मला ? म्या मारलं, ढोरावानी मारलं..."

"नाना" साहेबराव ओरडले, "तमाशा बंद कर. आणून टाकलेलं दप्तर घेऊन जा."

यावर नाना काय बोलणार ? नाना खाली मान घालून फकिराच्या अंगाला लोणीहळद चोळत होते !



कोसल्याचा पटका – रेशमी पटका, येसकर – वेसकर, वेशीवरचा रखवालदार, गढी – किल्लेवजा मोठा वाडा.



**अभ्यास :**

१. नानांचा फार दरारा होता हे कोणकोणत्या गोष्टींवरून समजते ?

२. काय घडले याची चौकशी न करता साहेबराव फकिराला मारायला का धावून गेले ?

३. फकिराला फार मारल्यामुळे त्यांना काय वाटले ? नंतर त्यांनी काय केले ?

४. वाक्यांत उपयोग करा :
मातबर, तोंडचा घास हिसकावून घेणे, तळपायाची आग मस्तकाला भिडणे.

५. खालील वाक्ये कोणी व केव्हा म्हटली आहेत ? त्यावरून त्या व्यक्तीचा कोणता स्वभाव दिसून येतो ?
(अ) 'म्या मारलं, ढोरावानी मारलं....,'
(आ) 'जित्ता है का मेलाय ? फुडच्या तयारीला लागा.'



.१८.

# मृगाचा पाऊस

## कुसुमावती देशपांडे

**कुसुमावती देशपांडे** (जन्म : १९०४, मृत्यू : १९६१.) इंग्रजीच्या प्राध्यापिका व कथा-लेखिका. 'दीपकळी', 'दीपदान', 'मोळी' ही व इतरही त्यांची काही पुस्तके प्रसिद्ध आहेत. पुढील कथा त्यांच्या 'दीपमाळ' या संग्रहातून घेतली आहे.

खालील कथेत एका गरीब शेतकरी स्त्रीचे चित्र रेखाटले आहे.

चार दिवसांपासून दुपारचे ढग येत. खूप अंधारून येई. पण लवकरच सोसाट्याचा वारा सुटे व पावसाचे सर्व अवसान कुठल्या कुठे निघून जाई. तिने दोन दिवस वाट पाहिली. तिसऱ्या दिवशीही तोच प्रकार. घरातला दाणादुणा संपत आला. उद्याला खायला काही नव्हते. म्हणून ती जिवाचा धडा करून बाजाराकडे निघालीच.

झोपडीच्या छपराच्या एका झरोक्यातून मधूनमधून उजेडाची तिरीप येई. तिकडे तिचा तान्हा सारखा टक लावून पाही. तिने मुलाला टोपलीत नीट ठेवले. त्याला तिरीप दिसेल, अशा ठिकाणी टोपली ठेवून ती बाहेर पडली. तिने पोराला एकटे टाकले. वादळ झाले तर त्याच्या अंगावर घालण्याइतका कपडाही तिच्या घरी नव्हता.

बाजार गच्च भरला होता. वादळाच्या भीतीने सर्वांची एकच धडपड चालली होती. एकच धांदल, एकच कोलाहल उडून गेला होता. तशात रोजचा वारा सुटला. पण तो आज एकटाच आला नाही! पश्चिमेच्या बाजूला पसरलेल्या प्रचंड काळ्याकुट्ट मेघांच्या बाजूने तो आला व त्याची साक्ष म्हणून त्याच्याबरोबर तडतडा वाजणारे टपोरे थेंबही आले.

पाच मिनिटांत सर्वत्र जलमय होऊन गेले. मग पहिले अवसान ओसरले; पण पाऊस पडतच राहिला. दोन–अडीच महिने धरणीने तगमगत वाट पाहिली. पर्जन्यरायाने पहिलीच भेट इतक्या अलोट प्रेमाने दिली, त्यामुळे तिचे मुख प्रसन्नतेने खुलून गेले. झाडांना टवटवी आली. घरे, छपरे स्वच्छ धुऊन निघाली. रस्त्याच्या बाजूंनी लहान लहान ओहोळ धावू लागले. मुलेबाळे 'पाऊस, पाऊस' करीत आपापल्या ओसऱ्यांतून, खिडक्यांतून गंमत पाहात उभी राहिली.



पण बाळाची आई कुठे होती? तिचा बाजार झाला का? वादळाचा पहिला थेंब अंगावर पडताच ती त्या सरीइतक्या वेगाने धावत निघाली. तिचे छबडे त्या झरोक्याखाली होते ना? एवढ्या प्रचंड झंझावाताने एखादे कौल उडवून दिले तर? छोटेसे छिद्र सापडले, की तिथे भगदाड पाडणे हे त्या राक्षसी वादळाचे कामच. तिला वाटू लागले, एखादे कौल ढासळले तर बाळाच्या अंगावर पडायचे! तो रडू नये म्हणून केवढा मूर्खपणा केला मी.

जाताना तिला वेळेची जाणीवही झाली नव्हती. पण तिला आता घर कितीतरी दूर वाटू लागले. आता तिच्या पायाखालची वाट सरेना. त्यातच रस्त्यावर पाणी साचलेले. तिच्या मनात सारखे येत होते—माझा बाळ निजला असेल का? झरोक्यातून गळणाऱ्या पाण्याने भिजला तर पडसे येईल त्याला....

यंत्राप्रमाणे तिचे पाय धावत होते. डोक्यावरचा पदर भिजून चिंब झाला.

केसांवरचे ओघळ गालांवर वाहू लागले. पाठीवर सारखा पावसाचा मारा बसत होता. झपझप पावलांनी उडणाऱ्या चिखलाने पोटऱ्या व पाठीकडले लुगडे भरून गेले.

दुरून तिला झोपडी दिसली. दार लावलेले होते. बाहेरून तरी सर्व व्यवस्थित होते. जवळपासचे वृक्ष डोलून डोलून थकले होते; पण एकदा गती मिळाल्यावर त्यांच्या फांद्या व पाने अजून नाचतच होती. त्यांचा तो हिरवा नाच तिच्या बाळास किती आवडे !

तिने दार उघडले. झोपडीत उजेड जास्त झाला होता. एक कौल पडले होते. पण ते पलीकडे, बाळापासून चार हातांवर. त्याचे तुकडे झाले होते. तिचा जीव खाली पडला.

"निजलं आहे गुणाचं !" असे म्हणून चटदिशी ती त्याच्याजवळ गेली. झरोक्यातून येणाऱ्या पाण्याने बाळाची टोपली चिंब झाली होती. गारठ्याने मुठी घट्ट आवळून खूप रडल्यामुळे तो थकून पडला होता. तिने त्याला चटकन उचलून पोटाशी धरले व ती खाली बसली. किती उत्सुकतेने तो तिच्या उबेत शिरला ! तिच्या डोळ्यांतून अश्रूही वाहू लागले. जणू त्या आनंदाच्या मृगधाराच !'



अभ्यास :

१. बाळाची आई बाजारात जाण्यासाठी का निघाली ? बाजारातून परत येताना तिचे लक्ष कुणाकडे लागले होते ?
२. बाजारात जाताना तिने मुलाला कुठे ठेवले ? का ?
३. घरी परत आल्यावर तिला कोणते दृश्य दिसले ?
४. तिची परिस्थिती गरिबीची होती, हे कोणकोणत्या वाक्यांवरून समजते ?
५. अर्थ सांगा : अवसान, कोलाहल, धरणी, जिवाचा धडा करणे, जीव खाली पडणे.
६. गोष्टीला 'मृगाचा पाऊस' हे नाव का दिले असावे ? दुसरे आणखी कोणते नाव देता येईल ?





## १९. सरहद्द गांधी

**श्रीपाद जोशी**

**श्रीपाद जोशी** (जन्म : १९२०.) प्रामुख्याने हिंदी व मराठी या भाषांतून स्वतंत्र लेखन व इतर भाषांमधून भाषांतरे त्यांनी केली आहेत. 'मी पाहिलेले गांधीजी', 'महात्मा गांधी : जीवन आणि शिकवण', 'भारतभ्रमण' ही व इतरही त्यांची काही पुस्तके प्रसिद्ध आहेत.

बादशहाखान हे नाव तुम्ही ऐकले असेलच. गांधींचे ते एक थोर अनुयायी. त्यांच्या जीवनातील काही घटना येथे दिल्या आहेत. त्या वाचा म्हणजे बादशहाखान यांच्या जीवनाचे ओझरते दर्शन तुम्हांला होऊ शकेल.

खान अब्दुल गफारखान यांनी महात्मा गांधींच्या खांद्याला खांदा लावून भारतीय स्वातंत्र्ययुद्धात भाग घेतला होता. भारत स्वतंत्र होण्यापूर्वी त्याच्या वायव्य सीमेवरील प्रांताला वायव्य सरहद्द प्रांत असे म्हणत असत. हा पठाण लोकांचा प्रदेश. गफारखान तिथलेच. ते महात्मा गांधींचे सच्चे अनुयायी आहेत, म्हणूनच त्यांना 'सरहद्द गांधी' असे म्हणतात. पठाण बांधवांचा त्यांच्यावर अतिशय लोभ. ते प्रेमाने त्यांना 'बादशहाखान' असे म्हणतात.

बादशहाखानांचा जन्म वायव्य सरहद्द प्रांतातील उतमानजई या गावी १८९० साली झाला. शाळेतील शिक्षण संपवून ते महाविद्यालयात गेले. त्या वेळी त्यांचे थोरले बंधू डॉक्टर खानसाहेब हे विलायतेत शिकत होते. आपणही आपल्या थोरल्या भावाप्रमाणे इंग्लंडला जावे आणि शिक्षण घेऊन इंजिनियर व्हावे असे बादशहाखानांना वाटे. म्हणून त्यांनी इंग्लंडला जायची तयारी केली. प्रत्यक्ष निघायचा दिवसही येऊन ठेपला. ते आपल्या आईचा निरोप घेण्यासाठी गेले तेव्हा तिचे हृदय भरून आले. थोरला मुलगा तर आधीच परदेशात गेलेला होता. आता दुसराही सोडून जाणार म्हणून तिला फार वाईट वाटले.

बादशहाखान यांचीही आपल्या आईवर फार माया होती. आईचे मन मोडणे त्यांच्या अगदी जिवावर आले. एकीकडे परदेशात जाऊन इंजिनियर होण्याची ओढ होती, तर दुसरीकडे आईचे मन त्यांना मोडवत नव्हते. अखेर मातृप्रेमाचा विजय झाला. त्यांनी इंग्लंडला जायचे रद्द केले. त्यांचे आपल्या आईवर जसे प्रेम होते तसेच मातृभूमीवरही होते. ते इंग्लंडला गेले नाहीत; पण त्याच वेळी आपले सारे जीवन मातृभूमीच्या सेवेला वाहून घेण्याचा त्यांनी मनाशी निश्चय केला.

पूर्वी पठाण लोकांत शिक्षणाचा प्रसार मुळीच झालेला नव्हता. बादशहाखानांनी आपल्या पठाण बांधवांना सुशिक्षित करण्याचा निर्धार केला. त्यांनी गावोगावी शाळा काढल्या. पठाण लोक शिकून शहाणे झाले तर आपल्या मानेवरील गुलामगिरीचे जू झुगारून देतील अशी भीती इंग्रज सरकारला वाटत असे. म्हणून ते बादशहाखानांवर खोटेनाटे आरोप ठेवून वेळोवेळी त्यांना तुरुंगात डांबून टाकत असत. गफारखान हे त्या वेळी इतके धिप्पाड व धष्टपुष्ट होते, की त्यांच्या हातापायांत घालता येतील अशा बेड्या तुरुंगात नव्हत्या! अखेर मोठ्या मुष्किलीने त्याच बेड्या त्यांच्या पायांत ठोकण्यात आल्या. त्यामुळे त्यांचे पाय रक्तबंबाळ झाले. तशा अवस्थेतच त्यांना न्यायालयात नेण्यासाठी एक अधिकारी आला. बादशहाखानांनी पायी चालावे अशी त्याची आज्ञा होती. बादशहाखान मोठे निर्भय. त्यांनी त्याला आपले रक्तबंबाळ झालेले पाय दाखवले आणि चालत जाण्याचे साफ नाकारले. अखेर तो अधिकारी वरमला. नाइलाजाने त्याला घोडागाडीची व्यवस्था करावी लागली.

एकदा एका इंग्रज अधिकाऱ्यासमोर बादशहाखानांना उभे करण्यात आले. त्याच्या प्रश्नांना ते उत्तरे देऊ लागले. बादशहाखानांचा आवाज जात्याच मोठा होता. तो अधिकारी चिडून म्हणाला, "जरा हळू बोल ना."

बादशहाखान हळू बोलू लागले. तेव्हा तो अधिकारी पुन्हा चिडून म्हणाला, "जरा मोठ्यानं बोल ना!"

बादशहाखान लगेच उसळून म्हणाले, "ही काय थट्टा चालवलीय तुम्ही? मी मोठ्यानं बोलू लागलो तर म्हणता, 'हळू बोल' आणि हळू बोलू लागलो तर म्हणता, 'मोठ्यानं बोल'; तेव्हा आधी कसं बोलायचं ते तुम्हीच शिकवा."



हे ऐकताच साहेबाच्या अंगाचा तिळपापड झाला आणि त्याने बादशहाखानांना पोलिसांच्या हवाली केले.

तुरुंगामध्ये बादशहाखानांना रोज वीस शेर गहू दळावे लागत. त्यांचा मोठेपणा ओळखणाऱ्या एका अधिकाऱ्याने त्यांना गव्हाऐवजी दळलेले पीठच देण्याची व्यवस्था केली; परंतु बादशहाखानांनी ते मान्य केले नाही. ते म्हणाले, "मला वडया साहेबांनी विचारलं तर मी सरळ सांगेन, की मला दळायचा त्रास पडू

नये म्हणून मला गव्हाऐवजी आटाच दिला जातो; तेव्हा तुम्ही मला नियमाप्रमाणं गहू द्यावेत, हेच बरं." त्यानंतर ते नियमाप्रमाणे रोज वीस शेर गहू दळत असत.

'खुदाई खिदमतगार' या नावाची एक संघटना बादशहाखानांनी स्थापन केली होती. लहानसहान गोष्टींवरूनही एकमेकांचा जीव घेणाऱ्या पठाणांना सेवेची व अहिंसेची शिकवण देणे जवळजवळ अशक्य होते; पण बादशहाखानांनी ते शक्य करून दाखवले. त्यांनी सबंध वायव्य सरहद्द प्रांतात खुदाई खिदमतगार संघटनेचे जाळे पसरवले. या संघटनेचे अनुयायी अन्यायाचा प्रतिकार करताना स्वतःच्या छातीवर गोळ्या झेलत; परंतु दुसऱ्यावर हात उचलत नसत. त्यांच्या या गुणांमुळेच इंग्रज म्हणत असत—'अहिंसक पठाण हा हिंसक पठाणापेक्षा अधिक शक्तिशाली असतो.'

बादशहाखान हे महात्मा गांधींप्रमाणे खरे लोकसेवक आहेत. हुद्दा, अधिकार, पैसा यांचा त्यांना मुळीच मोह नाही. १९३९ साली त्यांना काँग्रेसचे अध्यक्ष करावे, असे डॉ. राजेंद्रप्रसाद वगैरे थोर नेत्यांनी ठरवले. परंतु बादशहाखान यांनी त्यांना कळवले–'मी एक सैनिक आहे. खुदाई खिदमतगार आहे. लोकांची सेवा करत राहणंच मला आवडतं.'

अभ्यास :

१. अब्दुल गफारखान यांना 'सरहद्द गांधी' असे का म्हणतात?
२. बादशहाखान इंग्लंडला का गेले नाहीत? त्यांनी त्या वेळी कोणता निश्चय केला?
३. त्यांनी कोणती संस्था स्थापन केली? त्या संस्थेने कोणते कार्य केले?
४. बादशहाखान यांच्या तोंडची काही वाक्ये खाली दिली आहेत; त्यांवरून त्यांचे कोणते गुण दिसतात हे सांगा :
   (अ) तेव्हा तुम्ही मला नियमाप्रमाणं गहू दयावेत, हेच बरं.
   (आ) लोकांची सेवा करत राहणंच मला आवडतं.
   (इ) आधी कसं बोलायचं ते तुम्हीच शिकवा.
५. वाक्यांत उपयोग करा :
   हृदय भरून येणे, मन मोडणे, जू झुगारून देणे, जिवावर येणे.



## .२०.

# एकमेकां साह्य करू

**ल. नी. छापेकर**

**ल. नी. छापेकर** ( जन्म : १९०८.) नामवंत शिक्षक व शिक्षणतज्ज्ञ. यांची अनेक शालेय पुस्तके प्रसिद्ध आहेत.

शालेय जीवनातील सहकाराचे महत्त्व त्यांनी वस्तुभांडाराचे उदाहरण घेऊन उद्बोधक रीतीने पुढील पाठात मांडले आहे. प्रत्यक्ष स्वतःच्या अनुभवातूनच हा पाठ लिहिलेला असल्यामुळे त्याला विशेष मोल प्राप्त झाले आहे.

दिवाळीचे दिवस होते. घरोघर सण साजरा होत होता. भाऊबिजेसाठी संपतराव मुद्दाम रामपूरला आले होते. भाचा, भाची व बहीण यांच्यासाठी काही वस्तू खरेदी कराव्यात असे त्यांच्या मनात आले. दुपारी चार वाजायच्या सुमारास ते आपले मेहुणे नारायणराव यांना म्हणाले, "नारायणराव, बाजारात चलता का जरा? ताई, गणू व कमू यांच्यासाठी काही खरेदी करू या."

गणू तेथेच होता. तो मामांना म्हणाला, "आपण दोघे जाऊ बाजारात. आमच्या दुकानात कितीतरी नवीन नवीन वस्तू आल्या आहेत. मोठ्या छान आहेत त्या वस्तू. त्यांतल्याच आणू आपण काही. चलता आमच्या दुकानात?"

संपतरावांनी आश्चर्याने विचारले, "तुमचं दुकान? तुम्ही कधी दुकान काढलं?"

"आमचं म्हणजे आमच्या शाळेचं दुकान मामा. तुम्ही चला तर खरं." गणू म्हणाला.

"बरं, चला जाऊ या आपण. नारायणराव, आम्ही जाऊन येतो बाजारात."

मामा, गणू व कमू अशी तिघे बाजारात गेली. दुकानावर जायची गणूला व कमूला अगदी घाई झाली होती. तेथील खेळणी, पुस्तके, चित्रे, सारे सारे जणू त्यांच्या डोळ्यांसमोर होते. ते तिघे लवकरच शाळेतल्या सहकारी दुकानाजवळ येऊन पोचले. तेव्हा गणू उत्साहाने म्हणाला, "हे आमचं दुकान, मामा. आम्ही मुलंच हे दुकान चालवतो आणि ते दाराशी उभे आहेत ना, ते आमचे गुरुजी. तेच आम्हांला वेळोवेळी सल्ला देतात व मार्गदर्शन करतात. रोज एकदा तरी ते दुकानात येऊन जातात."

ते तिघे दुकानात शिरले. दुकानातील सदू गावकर याने त्यांचे स्वागत केले, "या. काय हवं आपल्याला? आपण आमच्या गणूचे पाहुणे ना?"

संपतरावांनी मानेनेच होकार दिला. तेव्हा गणू म्हणाला, "सदू, हे माझे मामा. मला, कमूला आणि आईला दिवाळीची भेट देण्यासाठी यांना काही वस्तू घ्यायच्या आहेत."

सदूने भेटी विभागाच्या विक्रेत्याला सांगितले, "राजाराम, यांना भेटीसाठी काही वस्तू दाखव बरं."

राजारामने भराभर साऱ्या वस्तू त्यांना दाखवायला सुरुवात केली.

त्या वस्तू पाहून मामांनी गणूला व कमूला विचारले, "गणू, कमू तुम्हांला काय पाहिजे यांतलं?"

कमू म्हणाली, "ही खेळाची पेटी छान आहे मामा. आम्हां दोघांनाही हिचा उपयोग होईल. वा! पेटीचं नाव किती मजेदार आहे. 'बहीण-भाऊ पेटी!' दोघांच्या खेळाचं सामान आहे तीत."

गणू म्हणाला, "मामा, खेळाच्या जोडीला निदान दोन-तीन पुस्तकंही घ्या."

मामांनी एक खेळाची पेटी व चार-पाच पुस्तके निवडली. बहिणीसाठी त्यांनी विणकामाचे साहित्य निवडले. सर्व वस्तूंची निवड नक्की केल्यानंतर मामा त्या वस्तूंच्या किमतीची चौकशी करू लागले.

"या खेळाच्या पेटीची किंमत किती?"

"अवघी साडेतीन रुपये."

"पेटी तर चांगली दिसते. अन् त्या मानानं किंमतही फार नाही. काही दोष तर नाही ना या पेटीत ?"

गुरुजी बाहेर उभे राहून हे सारे ऐकत होते. ते पुढे होऊन म्हणाले, "तुम्हांला तशी शंका येणं साहजिक आहे. पेटी चांगली आहे. तिच्यात दोष वगैरे काही नाही. आपली निवड चांगली आहे. इतर दुकानांत अशीच पेटी या किमतीस मिळणार नाही."

"मग तुम्ही कशी ही इतक्या कमी किमतीत विकता ? तुमच्या दुकानाला फायदा नको की काय ?"

"वा ! फायदा पाहिजे तर ! पण भरमसाट फायदा आम्ही घेत नाही. आमचे नफ्याचे प्रमाण ठरलेले आहे. आम्ही फक्त रुपयाला पाच पैसे नफा घेतो." असा गुरुजींनी खुलासा केला.

"पण यातून तुमचा खर्च कसा भागणार ?" मामांनी शंका काढली.

"त्याचं असं आहे पाहा—आमच्या दुकानात पगारी नोकरवर्ग नाही. आमच्या शाळेतील मुलंच दुकानातली सर्व कामं आळीपाळीनं करतात. आमच्या दुकानाचं भांडवलही काही कुणा एकाचं नाही. शाळेतील साऱ्या मुलांनीच हे भांडवल उभारलं आहे. प्रत्येकानं एकेक रुपयाचा भाग खरेदी करून ते उभारलं आहे. त्यामुळं आम्हांला वस्तू स्वस्त विकणं परवडतं. शिवाय आमचे हिशेबही चोख असतात. आता तर आपल्या शासनाकडून येणारी पुस्तकं आमच्या दुकानात विकायला मिळणार आहेत. सबंध जिल्ह्यासाठी लागणारी सर्व शालेय पुस्तकं आम्हांला मिळणार ! सर्व मुलं हीच या दुकानाचे मालक. तीच हे हिशेब ठेवतात. त्यामुळं हिशेबात गोंधळ होत नाही की अफरातफर होत नाही; कारण नफ्याचे तेच वाटेकरी असतात." गुरुजींनी सांगितले.

"बरोबर आहे. विनावेतन नोकरी व सचोटीचे हिशेब यामुळेच दुकानाचा पैसा कितीतरी वाचत असेल ! म्हणूनच तुमच्या शाळेतील मुलांना या दुकानाबद्दल आपुलकी वाटते. अहो, आमच्या गणूनं मला याच दुकानात का आग्रहानं आणलं हे कळलं मला आता. वा ! फारच छान कल्पना आहे ही."



"होय. आमच्या मुख्याध्यापकांचा तर असा कटाक्ष आहे, की सहकारी दुकान हे प्रत्येकाला आपलंच दुकान आहे असं वाटलं पाहिजे." सदू म्हणाला.

"वा! छान! दुकानाची व्यवस्था सुरेख आहे खरी; पण यामुळे मुलांचा अभ्यास नाही का हो बुडत?" संपतरावांनी शंका विचारली.

"आपण अगोदर खरेदी उरकून घ्या. मग बाहेरच्या कचेरीत आमचे गुरुजी आणि हा सदू आपल्याला आणखी माहिती देतील." राजारामने सुचवले.

संपतरावांनी त्या तिन्ही भेटवस्तू बांधून देण्यास सांगितले. पेटी, पुस्तके, शिवणकामाचे साहित्य अगोदरच राजारामने बाजूस काढून ठेवले होते. त्याने लगेच त्या वस्तू बांधून दिल्या व बिलही करून दिले.

त्या वस्तू घेऊन व बिल चुकते करून संपतराव गुरुजींबरोबर बाहेरच्या खोलीत आले. सदूही त्यांच्याबरोबरच होता. कचेरीत गेल्यावर सदू म्हणाला,

"मामा, या दुकानात आम्हांला फार तर एक तास काम पडतं. त्यामुळं आम्हांला बाजाराची माहिती होते व हिशेब ठेवता येतात. हाही अभ्यासाचाच भाग नाही का? शिवाय सहकार्य कसं करावं, येणाऱ्याजाणाऱ्यांशी कसं बोलावं, हेही आम्हांला कळतं. अनेकांशी मित्रत्व जोडता येतं. यासाठी रोज एक तास गेला तर आमचं नुकसान होतं असं तुम्ही म्हणाल का?"

"छे, छे! या तर फार आवश्यक अशाच गोष्टी आहेत! यामुळं कसलं नुकसान होणार?"

संपतरावांचे ते बोलणे ऐकून गुरुजींना समाधान वाटले. ते संपतरावांना म्हणाले, "सहकारी दुकान ही उत्तम नागरिक तयार करण्याची केंद्रंच आहेत. आता हेच पाहा ना! या दुकानावर सर्व मुलांचीच मालकी आहे. सर्व मुलांतर्फेच आम्ही दुकानाचा चिटणीस निवडतो. या वर्षी सदू गावकर हा चिटणीस आहे. आमच्या शाळेचे मुख्याध्यापक हेच आमच्या सहकारी दुकानाचे अध्यक्ष असतात. एक शिक्षक उपाध्यक्ष असतात. दुकानातील विक्रेतेसुद्धा मुलांमधूनच निवडले जातात. यामुळं खऱ्या काम करणाऱ्यांना योग्य संधी मिळते. अशी संधी मिळाल्यानंच सहकार्यानं काम करणारे उत्तम नागरिक तयार होतील, असं नाही वाटत तुम्हांला?"

"का नाही होणार? अवश्य होतील. पण संधी मिळाल्यावर त्यांना योग्य मार्गदर्शन करायला आपल्यासारखे गुरुजी मात्र मिळाले पाहिजेत."

"ते काही विशेष अवघड नाही. पालकांनीच आता मात्र अशा प्रकारच्या शिक्षणाची तयारी ठेवली पाहिजे. या दुकानाचं काम, शाळेच्या ग्रंथालयाचं काम हेदेखील महत्त्वाचं शिक्षण आहे, हे त्यांना पटलं पाहिजे."

"नीट समजून घेण्याची संधी मिळाली तर जरूर समजेल त्यांना. मीही यापुढं सहकाराचा हा मार्ग सर्वांना समजावून सांगेन. आमचा गाव लहान आहे, पण तेथेही हा सहकाराचा प्रयोग आम्ही अवश्य करून पाहू. आपण मात्र आम्हांला मदत करा. बरं येतो. नमस्कार."

"ठीक. या. नमस्कार. दुकानाबरोबरच आमच्या शाळेचीसुद्धा आठवण ठेवा."

मामा, गणू व कमू घरी परत निघाले. गणूला तर आता त्यांच्या दुकानाचा फारच अभिमान वाटत होता. तो मामांना म्हणाला, "मामा, कसं आहे आमचं दुकान?"

"वा! सुरेख. फारच छान आहे. इथं आल्यावर आता तुझ्याच दुकानातून मी खरेदी करत जाईन. खरं खरं सहकारी दुकान आहे तुमचं. 'एकमेकां साह्य करू। अवघे धरू सुपंथ'–हाच खरा सहकाराचा संदेश. तो मला तुमच्या या दुकानानं दिला. तुम्हीही तो तुमच्या वर्तनानं मला पटवलात. भरभराट होईल तुमच्या सहकारी दुकानाची. कल्याण होईल तुमचं."

**अभ्यास :**

१. सहकारी दुकान कोणाचे होते? त्याला 'सहकारी' का म्हणायचे?
२. दुकानाबद्दल मामांना कोणकोणती माहिती मिळाली? त्याबद्दल मामांच्या मनात कोणकोणत्या शंका आल्या? त्यांच्या शंकांचे कोणी व कसे निरसन केले?
३. मामांनी गुरुजींना कोणते आश्वासन दिले? का?
४. सहकारी दुकानच चांगले होते हे कोणकोणत्या गोष्टींवरून दिसून येते?
५. 'आम्ही दिवाळी कशी साजरी केली?' यावर पंधरा-वीस ओळींचे मित्रास पत्र लिहा.
६. मार्गदर्शन, विक्रेता, साहजिक, आपुलकी, आवश्यक या शब्दांचा अर्थ सांगा व त्यांचा वाक्यांत उपयोग करा.

✤ ✤



# .२१. पंपूशेट

## प्र. के. अत्रे

**प्र. के. अत्रे** (जन्म : १८९८, मृत्यू : १९६९.) यांच्या 'कवडीचुंबक' या नाटकातून खालील उतारा घेतला आहे. आचार्य अत्रे हे विनोदी लेखक, कवी, नाटककार व पत्रकार होते. 'साष्टांग नमस्कार', 'उद्याचा संसार', 'घराबाहेर' ही व इतरही त्यांची अनेक नाटके प्रसिद्ध आहेत.

पंपूशेट हे या नाटकातील एक प्रमुख पात्र. पैशापुढे इतर साऱ्या गोष्टी त्याला तुच्छ वाटतात. भीक मागणाऱ्या याचकाशी तो कसा वागतो, हे या उताऱ्यात पाहा.

पंपूशेट : काय रे, कोणाला विचारून या घरात शिरलास? 'भिकाऱ्यांना या घरात प्रवेश करायला मनाई आहे' असं दारावर मोठ्या अक्षरांत मी लिहून ठेवलं आहे, ते वाचलं नाहीस वाटतं!

रामदासी : मी भिकारी नाही, रामदासी आहे. रामाचा भक्त आहे. समर्थांचा सेवक आहे. या भूमंडळावर वाटेल तिथं जायची आणि हिंडायची आम्हांला मोकळीक आहे. 'जय जय रघुवीर समर्थ' अशी आम्ही आरोळी ठोकली, की राजवाड्याचे दरवाजेदेखील आम्हांला उघडतात. 'समर्थाचिया सेवका वक्र पाहे। असा सर्व भूमंडळी कोण आहे?'

पंपूशेट : अरे, वारे वा! म्हणे असा सर्व भूमंडळी कोण आहे? तुमच्या मानगुटीला धरून तुम्हांला गचांड्या मारायला ह्या भूमंडळावर हा पंपूशेट पैठणकर समर्थ आहे. तुम्ही रामदासी, संन्यासी, बैरागी अन् भिक्षेकरी निरनिराळी सोंगं घेऊन दिवसाढवळ्या लोकांच्या घरात शिरता आणि देवांची नावं घेऊन राजरोसपणे चोऱ्या करता. मी काय ओळखत नाही तुम्हांला?

रामदासी : शेटजी, तोंड संभाळून बोला – तोंड संभाळून बोला. माझ्यासारख्या

रामाच्या भक्ताला तुम्ही चोर म्हणताहात! राम तुमचं कधी कल्याण करणार नाही.

पंपूशेट : त्याची तू काळजी करू नकोस. राम माझं काय करणार आहे, ते राम अन् मी पाहून घेईन. पण रामाच्या नावावर तुझं तर तू व्यवस्थितपणे कल्याण करून घेतो आहेस ना? काय रे, घरोघर हिंडून धान्य अन् पैसा गोळा करता, ते काय रामाला मनीऑर्डरीनं पाठवून देता, होय रे?

रामदासी : तुमच्यापाशी बोलण्यात काय अर्थ आहे? जातो मी!

पंपूशेट : जातोस कुठं? असा जाऊन देईन होय तुला मी? (मोठ्याने) केशर, केशर, मेलास काय रे!

रामदासी (घाबरून) : म्हणजे विचार काय आहे तुमचा?

केशर : (धावत येतो.) काय मालक?

पंपूशेट : गाढवा! हा भगवा रामोशी दिवसाढवळ्या घरातून चोरी करून चालला आहे अन तू काय झोपा घेतो आहेस काय रे?

केशर : (रामदाशाकडे पाहात) मालक, तुम्ही याला ओळखलं नाही वाटतं! अहो, गेल्या वर्षी आपण याला एक पैसा दिला होता.

पंपूशेट : गेल्या वर्षी ह्याला मी एक पैसा दिला होता? काय! भलतंच काय सांगतो आहेस! शक्य नाही. मी नाही, तू दिला असशील! तरीच गेल्या वर्षाच्या माझ्या हिशेबात एक पैशाची तूट आली होती.

केशर : तुमच्या लक्षात नाही आलं मालक! अहो, तो पैसा दोन्ही बाजूंनी साफ गुळगुळीत झालेला, गावात दहा ठिकाणी चालवण्याचा प्रयत्न करूनही परत आलेला—

पंपूशेट : (हसून) अस्सं – अस्सं, तो पैसा! दिलास ना तू ह्याला? झालं तर! मग फिरून कशाला त्रास द्यायला हा आला?

केशर : तेव्हापासून सोकावलाय. मी ह्याला दहा वेळा सांगितलं, की आम्ही आयुष्यामध्ये फक्त एकदाच दानधर्म करतो; पुन्हा पुन्हा करत नाही.

पंपूशेट : अगदी बरोबर!

केशर : (रामदाशाला) काय रे, सांगितलं होतं की नाही मी तुला ?

पंपूशेट : तू हुज्जत कशाला घालतो आहेस त्याच्याशी ? आधी त्याचे सारे खिसे तपास अन् झोळीत काय आहे, ते बघ—

रामदासी : म्हणजे, हा निव्वळ जुलूम आहे. माझ्यावर चोरीचा आरोप करताहात आणि लुबाडता आहात की !

केशर : (अगदी बारकाईने त्याचा झाडा घेतो.) खिशांत काही नाही. फक्त सुपारीची ही दोन खांडं आणि तीन विड्या आहेत.

पंपूशेट : (त्याच्यावर झडप घालत ....) आपल्याच आहेत त्या – आण इकडं.

रामदासी : मग झोळीतलं सारं धान्य तुमचंच असेल !

पंपूशेट : बघू दे, अबब ! केवढी रे ही झोळी ? भीक मागायला तुम्हांला



एवढ्या रे झोळ्या कशाला लागतात? माझा सारा वाडा ह्या झोळीत घालून नेलास, तरी कुणाला पत्ता लागायचा नाही!

केशर : (आतून दोन मुठी धान्य काढतो.) हिच्यात तांदूळ अन् गहू आहेत.

पंपूशेट : अरेच्या, हे सगळं आपलंच धान्य आहे की!

रामदासी : आता मात्र कमाल केलीत तुम्ही! अहो, काय बोलता काय? सगळं धान्य सारखंच असतं! ह्या धान्यावर तुमचं नाव लिहून ठेवलं आहे काय?

पंपूशेट : अर्थातच. दाने दानेपर लिखा है पंपूशेटका नाम! केशर बघतो आहेस काय! पळ, ही झोळी आतून रिकामी करून आण –

(केशर झोळी घेऊन आत धावत जातो.)

रामदासी : (खाली मटकन बसत....) जय जय रघुवीर समर्थ!

पंपूशेट : आता तरी सन्मार्गानं वागा. आणि पुन्हा अशा चोऱ्या करत जाऊ नका.

केशर : (केशर रिकामी झोळी घेऊन येतो व रामदाशाच्या अंगावर फेकून देतो.) घे ही—

रामदासी : झोळी परत केल्याबद्दल आभारी आहे मी तुमचा. बरं आहे, येतो. (जाता जाता संताप असह्य होऊन....) आग लागो साऱ्या कवडीचुंबकांना!

पंपूशेट : ह्याचा अर्थ?

रामदासी : ह्याचा अर्थ सारे कवडीचुंबक पायापासून डोक्यापर्यंत पेटोत अन् त्यांचं चांगलं वस्त्रगाळ भस्म होवो!

पंपूशेट : कुणाला उद्देशून म्हणालास तू हे?

रामदासी : मी आपला माझ्या मनाला बोललो!

पंपूशेट : असं काय, ठीक आहे. मग मलाही तुझ्या पाठीशी थोडसं बोलायचं आहे. केशर आतून माझा सोटा आण पाहू—

रामदासी : जातो बरं शेटजी. नका तसदी घेऊ; नाहीतर जीव घ्याल तुम्ही माझा. तेवढंच माझं घ्यायचं तुम्ही आता बाकी ठेवलं आहे. जय गोपाळ. (घाईघाईने निघून जातो. केशर त्याच्या मागोमाग जातो.)

पंपूशेट : सोट्याचं नाव काढल्यावर कशी घाबरगुंडी उडाली गुलामाची ! छे, छे, छे ! माणसाजवळ पैसा असणं ही फार मोठी आफत आहे. जन्मभर कवडी कवडी करून मी एक लाख रुपये शिल्लक ठेवले आणि स्वतःवर नसतं संकट मात्र ओढवून घेतलं. खरंच, दरिद्री लोकांसारखं सुखी नसेल कुणी जगात ! कोणतीही गोष्ट संभाळायची त्यांना मुळी विवंचनाच नसते कधी. आता मी एवढया काटकसरीनं राहतो. एक दमडीदेखील कधी खर्च करत नाही. स्वतःच्या दारिद्र्याचं प्रत्येकाजवळ रडगाणं गातो. तरीदेखील माझ्याजवळ लाख रुपये आहेत ही बातमी ह्या लोकांच्या कानावर गेली कशी, हेच समजत नाही. पैसा एक वेळ जमा करणं सोपं आहे, पण तो सुरक्षितपणे ठेवायचा कुठं हा फार मोठा अवघड प्रश्न आहे.

कवडीचुंबक – कंजूप माणूस, आफत – संकट, विवंचना – काळजी.

अभ्यास :

१. 'भिकाऱ्यांना या घरात प्रवेश करायला मनाई आहे' अशी पाटी पंपूशेटने दारावर का लावली होती ?
२. पंपूशेटने रामदासी भिकाऱ्याला कसे लुबाडले ?
३. 'माणसाजवळ पैसा असणं ही फार मोठी आफत आहे' असे पंपूशेट का म्हणतो ?
४. पंपूशेट हा अस्सल कवडीचुंबक होता हे दाखवणारी काही वाक्ये सांगा.



# .२२.
# मातेचे मन

## दामू धोत्रे

दामू धोत्रे (जन्म : १९०२.) यांच्या 'वाघसिंह माझे सखेसोबती' या आत्मचरित्रातून 'मातेचे मन' हा पाठ घेतला आहे. श्री. धोत्रे हे पशुशिक्षक म्हणून सर्व जगाला परिचित आहेत. अनेक देशांतील सर्कशीत पशुशिक्षक म्हणून त्यांनी कित्येक वर्षे काम केले आहे.

सर्कशीच्या जीवनातील आपला एक अनुभव त्यांनी इथे सांगितला आहे. तुम्हांला तो खचितच आवडेल.

चीनमध्ये त्या काळी सर्कशी बऱ्याच होत्या. पण कित्येक सर्कशीत हिंस्र श्वापदांची कामे नसत. इझाको सर्कशीमध्ये मी घेत असलेली हिंस्र श्वापदांची कामे हे एक नावीन्यच होते. त्यामुळे इझाको सर्कसला तिथे विशेष महत्त्व आले व प्रसिद्‌धी मिळाली. हिंस्र श्वापदांची कामे फारच अवघड व रोमांचकारक होती. ती पाहण्यासाठी खेळांना मोठी गर्दी उडे.

माझ्या मुलाखती घेण्यासाठी वृत्तपत्र-प्रतिनिधींची सारखी रीघ लागलेली असे. काही पत्रकारांना मात्र माझ्या नुसत्या मुलाखती प्रसिद्‌ध करण्यात स्वारस्य वाटत नसे. त्यांच्यापैकी काहींनी सुचवले, की मी तंबूबाहेर पिंजरा उभा करावा व त्या पिंजऱ्यात उघड्यावर हिंस्र श्वापदांची कामे घ्यावीत. असे केल्याने त्या कामांची छायाचित्रे घेणे त्यांना सोयीचे होईल. मला ती सूचना अगदी पसंत पडली. त्यांना छायाचित्रे घेता यावीत या दृष्टीने तंबूबाहेर खेळ करण्याचे मी ठरवले.

तंबूच्या बाहेर रिंगण तयार करून मी खेळाचा पिंजराही उभारला. दुसऱ्या दिवशी सकाळी आठ वाजता कॅमेरा वगैरे घेऊन तयारीने येण्यासाठी मी

पत्रप्रतिनिधींना कळवले. ते हजर होताच मी खेळाचा पोशाख करून जनावरांसह पिंजऱ्यात गेलो. १२ मे १९३५ चा तो दिवस होता.

जनावरांच्या प्रत्येक कृतीचे चित्रण नीट करता यावे म्हणून एकेक काम मला अनेकदा करून घ्यावे लागत होते. माणसांची छायाचित्रे घेतानाही किती त्रास होतो, तर हिंस्र श्वापदांच्या कामांची छायाचित्रे घेणे किती मुष्किलीचे झाले असेल याची कल्पनाच केलेली बरी !

तंबूबाहेर पिंजऱ्यात जनावरांची कामे अशी चालू असतानाच काही मोतद्दारांनी तबेल्यांतील घोडी सोडली व ते त्यांना तंबूत तालमीसाठी घेऊन जाऊ लागले. आमच्या पिंजऱ्याजवळून ती घोडी जाऊ लागली; तशी पिंजऱ्यातील जनावरे त्यांना पाहून कावरीबावरी झाली व चेतावली. त्यांच्या बावरलेल्या मनःस्थितीकडे मी द्यावे तसे लक्ष दिले नाही. त्यांच्या घेतल्या जाणाऱ्या छायाचित्रांकडेच माझे अधिक लक्ष होते.

एक काम आटोपून दुसऱ्या कामासाठी मी स्टुलांची मांडणी व रचना करू लागलो. इतक्यात एका सिंहाने पाठीमागून माझ्यावर हल्ला केला. माझ्या उजव्या हाताचा दंड त्याने एकदम तोंडाने पकडला. मी चकित झालो; कारण माझ्यावर हल्ला करणारा सिंह चांगला माणसाळलेला व सुस्वभावी होता.

त्याने आपल्या जबड्यात माझा दंड पकडलेला पाहताच मी क्षणही वाया घालवला नाही. त्याच्या तीक्ष्ण व मजबूत सुळ्यांची पकड दंडावर घट्ट बसण्यापूर्वीच, मी त्याच्या जबड्यातून दंड हिसकावून बाहेर घेतला आणि पुढे उडी मारली. मी तोंडातून सुटलेला पाहताच, त्या सिंहाने मला रागाने पंजा हाणला आणि उडी मारता मारता त्याच्या पंजाचा तडाखा माझ्या उजव्या मांडीवर बसला. त्या बळकट पंजाचा तडाखा इतका जोरकस होता की मी कोलमडूनच पडलो असतो; पण सावरलो.

त्याच्या तडाख्यातून निसटताच मी उलट फिरून त्याला तोंड दिले. तोच दुसऱ्या बाजूला उभ्या असलेल्या सिंहाने माझ्यावर चाल केली. आता एकच नव्हे, तर एकदम दोन सिंहांना तोंड देण्याची माझ्यावर पाळी आली. चवताळून उठलेले ते दोन सिंह समोर आणि माझ्या हातात ना काठी ना चाबूक !

जिवावर बेतले की युक्त्या सुचतात. जवळ असलेली छोटी स्टुले उचलून ती त्या सिंहांच्या अंगांवर मी भिरकावली. स्टुलांचा मार लागताच ते दोन्ही सिंह गुरगुरत परत फिरले आणि त्यांच्या रागाच्या पहिल्या तडाख्यातून मी बचावलो. ते मागे हटलेले पाहताच मी लगेच चाबूक हाती घेतला. कामे पूर्ण केल्याशिवाय कुठल्याही जनावरास सोडायचे नाही हा तर माझा शिरस्ताच! या वेळी आपण यांना सूट दिली तर ती त्यांची नेहमीची सवय होणार, हे मी जाणले नि चाबूक फडकावून हुकमी आवाजात खणखणलो...

तो हुकमी आवाज ऐकताच पिंजऱ्यातील सगळीच जनावरे निमूटपणे काम करू लागली. सुमारे दहा मिनिटेपर्यंत मी न डगमगता त्याच ठिकाणी त्यांची कामे घेतली. ठरलेली सगळी कामे पूर्ण झाली, तेव्हाच मी पिंजऱ्याबाहेर आलो. छायाचित्रकारांना जी चित्रे हवी होती तीही त्यांना अनायासे घेता आली.

दंडावर झालेल्या जखमांतून तोवर रक्त निथळत राहून मला खूपच थकवा आला आणि दंडही चांगलाच सुजला. पिंजऱ्याबाहेर येताच सगळ्या पत्रकारांनी माझे अभिनंदन केले. मला लागलीच शुश्रूषेसाठी रुग्णालयात नेण्यात आले. अंगावरील जखमा धुऊन मलमपट्टी करण्यात आली. चारपाच दिवसांत जखमा भरून आल्या आणि मला पूर्ण बरे वाटले.

त्या दिवशी मी सिंहांच्या तोंडांतून सुटलो ही किती भाग्याची गोष्ट! माझ्या हातावर त्याच्या जबड्याची पूर्ण पकड बसण्यापूर्वीच मी माझा हात हिसकावून घेऊ शकलो; म्हणूनच मी त्या संकटातून बचावलो. माझे नशीब बलवत्तर होते म्हणायचे! वाघसिंहांच्या जबड्याची पकड अनुभवल्याशिवाय ती किती भयंकर असते याची कल्पनाच येणे कठीण.

मला सिंहाने जखमी केल्याची हकीगत दुसऱ्या दिवशी वर्तमानपत्रांतून रकानेच्या रकाने भरून प्रसिद्ध झाली. ही बातमी व चित्रे भडकपणे प्रसिद्ध झाल्यामुळे एका दिवसात माझे नाव शांघायमध्ये ज्याच्या त्याच्या तोंडी झाले. माझ्या साहसाची व धैर्याची स्तुती करणारी अनेक पत्रे मला आली. तुम्ही कुठल्याही क्षेत्रात यशस्वीपणे चमकू लागलात, की चाहत्यांकडून अशी पत्रे तुम्हांला येऊ लागतात. त्यात विशेष असे काही नाही. पण त्या वेळी मला एका वृद्ध फ्रेंच

स्त्रीकडून एक चटका लावणारे पत्र आले होते. मातृहृदयाच्या प्रेमळपणाची साक्ष म्हणून मी ते पत्र अजूनही जतन करून ठेवले आहे.

तिने लिहिले आहे—

'मुला, सिंहाने तुझ्यावर झडप घालून हल्ला केल्याची हकीगत मी वृत्तपत्रांतून वाचली आणि माझे हृदय कळवळले. तुम्ही तरुण मुले भलभलती साहसे करायला प्रवृत्त होता आणि संकटे ओढवून घेता. पण त्या वेळी आईची आठवण तुमच्या मनात कधी तरी येते काय? बाळा, तू विनाकारण आपला जीव धोक्यात घालू नकोस, असे मी तुला आईच्या मायेने कळवळून सांगते. तुझ्या जिवाचे काल काही बरेवाईट झाले असते, तर तुझ्या आईच्या जिवाला किती यातना झाल्या असत्या! तुला तिच्या दुःखाची कल्पना येणार नाही; पण मी पुत्र-वियोगाचे दुःख अनुभवले आहे. तिचे दुःख मी जाणू शकते. मुला, तू अशी संकटे पुन्हा स्वतःवर ओढवून घेऊ नकोस रे!'



हे पत्र मी आजवर जतन करून ठेवले आहे. ज्या दिवशी सिंहाने माझ्यावर हल्ला केला त्याच दिवशी तिचा एकुलता एक मुलगा शांघाय शहरातच मोटारच्या अपघातात सापडून ठार झाला होता. त्या दुःखाने ती होरपळली असतानाच माझ्यावरील हल्ल्याचे वर्णन वाचून त्या मातेचे मन कळवळले. तिच्या या पत्राकडे लक्ष गेले, की आजही मला माझ्या आईची आठवण येते !



अभ्यास :

१. हिंस्र पशूंकडून कामे करवून घेताना लेखकाच्या जिवावर कोणते संकट ओढवले ? त्यातून त्याने स्वतःचा बचाव कसा करून घेतला ?

२. स्वतः दुःखात असतानाही त्या वृद्ध फ्रेंच स्त्रीने पत्र का पाठवले ?

३. ते पत्र लेखकाने जपून का ठेवले ?

४. जिवावर बेतले की युक्त्या सुचतात, या म्हणण्याची सत्यता पटवणारी दुसरी एखादी घटना सांगा.

५. वाक्यांत उपयोग करा :
हिंस्र, स्वारस्य, पत्रप्रतिनिधी, मनःस्थिती, मातृहृदय.





# .२३.
# चंद्रावर स्वारी

## सोमनाथ समेळ

**सोमनाथ समेळ :** (जन्म १९३०.) 'जादूची खिडकी' हे त्यांचे पुस्तक प्रसिद्ध आहे. त्यांनी अंतराळ विषयावर लेखन केले आहे. पुढे दिलेला 'चंद्रावर स्वारी' हा पाठ त्यांनी लिहिला आहे.

'रामचंद्राचा चंद्रासाठी बालहट्ट' ही गोष्ट तुम्ही ऐकली असेल. चंद्राबद्दल कुणाला कुतूहल नसते ? पण हा चंद्र आता फारसा दूर राहिला नाही. प्रत्यक्ष चंद्रभूमीवर माणसांच्या पावलांचे ठसेही आता उमटले आहेत. माणसाने हा महान विजय कसा संपादन केला, ही गोष्ट पुढे दिली आहे.

"सुरेख ! फारच छान !" चंद्रावर पाऊल ठेवताच आल्ड्रिनच्या तोंडातून हे शब्द सहजच बाहेर पडले. त्याला चंद्रभमीवर चालताना मोठी गंमत वाटत होती.

२१ जुलै, १९६९ रोजी अमेरिकेचे दोन अंतराळवीर आर्मस्ट्रॉंग व आल्ड्रिन यांनी चंद्रभूमीला स्पर्श केला. त्यांच्याबरोबर कॉलिन्सही होता. त्यांनी अपोलो ११ या अंतराळयानात बसून चंद्र गाठला होता. विज्ञानाच्या साहाय्याने मानवाने अनेक शोध लावले असले तरी पृथ्वीपासून दूर खूप खूप अंतरावर असणाऱ्या ग्रहगोलासंबंधी त्याचे कुतूहल दिवसेंदिवस वाढतच होते. निदान चंद्रावर उतरून ग्रहगोलासंबंधी माहिती मिळवण्यास आरंभ करावा असे शास्त्रज्ञांना वाटले. यासाठी त्यांनी अहोरात्र प्रयत्न केले होते. शेवटी या प्रयत्नांना यश आले.

हे अंतराळयान खूप जड होते. ते आकाशात खूप वर उडवणे सहज शक्य नव्हते. एका प्रचंड अग्निबाणाच्या साहाय्याने ते अंतराळयान वर आकाशात फेकले गेले. हा अग्निबाण किती मोठा होता हे माहीत आहे का तुम्हांला ?

छत्तीस मजली उंच! आणि त्याच्या साहाय्याने इतका दूरचा प्रवास करणे कितीतरी धोक्याचे!

पृथ्वीभोवती हवेचे आवरण आहे म्हणून बरे आहे. त्या वातावरणामुळे सूर्याचा प्रकाश पृथ्वीवर पसरतो. हवेमुळेच आपल्या अवतीभवती थोडीफार उष्णता असते. या वातावरणाबाहेर, म्हणजे पृथ्वीपासून लांब गेले की ही स्थिती बदलते. तेथे हवा नसते. सूर्याचे किरण हवेतील धुळीच्या कणांवर पडले की प्रकाश पसरतो. पण वातावरणाबाहेर हवा नसल्यामुळे सूर्याचे किरण असूनदेखील प्रकाश पसरू शकत नाही. जिकडेतिकडे अंधारच अंधार! वातावरण नसल्यामुळे आणखी एक अडचण निर्माण होते. अंतराळयान वातावरणाबाहेर गेले की ते वितळण्याचा धोका असतो. त्याचा सूर्याकडे असलेला भाग सूर्याच्या किरणांमुळे तापतो. ज्या भागावर सूर्याचे किरण पडत नाहीत तो भाग बर्फापेक्षा कितीतरी पटीने थंड होतो. सूर्याकडे असलेला भाग सारखा तापत राहिला तर तो उष्णतेमुळे वितळून जाईल. बाकीच्या भागावरदेखील मग सूर्याचे किरण पडतील व हळूहळू सगळेच यान नष्ट होईल. हा धोका टाळण्यासाठी ते नेहमी स्वतःभोवती संथपणे फिरत ठेवावे लागते. सूर्याच्या उष्णतेचा आणि थंडीचा परिणाम शरीरावर होऊ नये म्हणून अंतराळवीरांना विशेष प्रकारचा पोशाख करावा लागतो. चंद्राला स्पर्श करून आलेल्या अंतराळवीरांचा पोशाख कापडाचे एकावर एक असे एकवीस थर रचून तयार केला होता. एकवीस थर! किती उकडले असते त्यांना? म्हणून तर त्यातून थंड हवा खेळवण्याचीही व्यवस्था केली होती.

अंतराळातल्या गमतीदेखील खूप आहेत. पृथ्वीवर दिवसामागून रात्र व रात्रीमागून दिवस असतात. पण एकदा अंतराळात वातावरणाच्या पलीकडे गेले, की जिकडेतिकडे नेहमी अंधारच अंधार. खूप लांबवर तळपत असलेला सूर्य समोर असूनदेखील अंधारच असतो. तेथे धूळ असती तर त्या कणांमुळे सूर्याचा प्रकाश येथेही पसरला असता. इकडे सूर्य तळपतो आहे आणि त्याच वेळी तिकडे चांदण्याही अधिक तेजाने चमकत आहेत, असे विलक्षण दृश्य येथे पाहायला मिळेल. सूर्य उगवल्यावर तुम्ही कधी चांदण्या लुकलुकताना पाहिल्या आहेत का? आहे की नाही गंमत!



आपल्या हातून काही निसटले की ते खाली पडते. झाडाचे फळदेखील खाली पडते. आपण चेंडू कितीही जोराने वर आकाशात फेकला तरी तो खाली पडणारच. पृथ्वीच्या अंगी खूप मोठी शक्ती आहे. सर्व वस्तूंना पृथ्वी स्वतःकडे ओढून घेते. आणि म्हणून पृथ्वीपासून दूर जाणे फार कठीण. पृथ्वीपासून दूर जाण्यासाठी खूप शक्ती लागते. वातावरणाच्या बाहेर जायला तर खूपच मोठी शक्ती लागते. याच कारणामुळे अंतराळयान उडवण्यासाठी प्रचंड शक्तीची आवश्यकता असते. ती पुरवण्याचे काम अग्निबाण करतो. अंतराळयान प्रचंड अग्निबाणाच्या वरच्या टोकावर बसवतात व अग्निबाण पेटवतात. बाणाचा स्फोट होतो व ते मोठ्या वेगाने वर धावते. १६ जुलै १९६९ रोजी अपोलो ११ हे अंतराळयान असेच अग्निबाणाच्या साहाय्याने आकाशात वर उडवले गेले; तेव्हा बाणाचा खूप मोठा स्फोट झाला. तेथे असलेल्या लोकांना तर सारी पृथ्वीच हादरल्यासारख वाटले. अशा रीतीने पृथ्वीच्या गुरुत्वाकर्षणातून हे अंतराळयान मुक्त झाले व मोठ्या वेगाने चंद्राच्या

दिशेने उडू लागले. त्या यानाचा वेग किती होता माहीत आहे तुम्हांला? आपली एस्. टी. बस तासाला पस्तीस ते चाळीस कि. मी. धावते. वेगवान विमाने एका तासात सुमारे हजार कि. मी. चे अंतर कापू शकतात. आणि अपोलो ११ चा वेग? वेगवान विमानापेक्षाही चाळीसपट वेगाने ते यान धावत होते!



चंद्राजवळ गेल्यावर अंतराळवीरांनी यानाचा वेग कमी केला. या मुख्य यानाबरोबर त्यांनी चंद्रावर उतरण्यासाठी छोट्या आकाराचे एक चांद्रयान आपल्या यानाला जोडून नेले होते. त्याचे नाव 'ईगल'. चांद्रयानात शिरण्याची वेळ झाली आणि अंतराळवीर आर्मस्ट्रॉंग व आल्ड्रिन हे दोघे सरपटत चांद्रयानात शिरले. त्यांनी ते मुख्य यानापासून वेगळे केले. त्यांचा तिसरा सहकारी कॉलिन्स अंतराळयानातच थांबला. तो त्या दोघांची परतण्याची वाट पाहात चंद्राभोवती घिरट्या घालत होता. आर्मस्ट्रॉंग व आल्ड्रिन यांचे चांद्रयान हळूहळू चंद्रभूमीकडे चालले होते. चंद्रभूमीवर त्यांना डोंगराच्या रांगा व ठिकठिकाणी खळगे दिसत होते. अधूनमधून सपाट मैदानेही आढळली. चांद्रयान नेमके कोणत्या जागी उतरवायचे हे आर्मस्ट्रॉंगने नीट न्याहाळून ठरवले. हळूहळू त्याने आपले यान चंद्रभूमीवर एका सपाट जागी उतरवले. पृथ्वीवरील सर्व लोक चंद्रावरील या स्वारीसंबंधीच्या बातमीकडे कान लावून बसले होते. क्षणाक्षणाला त्यांची उत्सुकता वाढत होती आणि शेवटी अमेरिकन रेडिओने 'ईगल उतरले' अशी

बातमी दिल्याबरोबर लोकांचा आनंद गगनात मावेनासा झाला. अखिल मानवजातीला अभिमान वाटावा असा तो क्षण होता! त्या दिवशी मानवाने अपूर्व यश मिळवले होते!

प्रथम आर्मस्ट्रॉंग चंद्रभूमीवर उतरला. नंतर आल्ड्रिनने चंद्रभूमीला स्पर्श केला. आर्मस्ट्रॉंगला त्या वेळी काय वाटले असेल? चंद्रभूमीवर पाय ठेवताना तो म्हणाला, "एका मानवाचं हे छोटं पाऊल असलं तरी उभ्या मानवजातीनं घेतलेली ही प्रचंड झेप आहे!"



अवजड – बोजड, मोठा, अंतराळ – खूप उंच उंच असे आकाश, यान – वाहन, आवरण – आच्छादन.



**अभ्यास :**

१. अंतराळयान स्वत:भोवती का फिरते ठेवावे लागते?

२. अंतराळात कोणकोणत्या गमती पाहायला मिळतात?

३. अंतराळवीरांना चंद्रभूमीवर काय काय दिसले?

४. खालील वाक्ये कोणी कोणास उद्देशून व केव्हा उच्चारली?

(अ) 'सुरेख, फारच छान'

(आ) 'एका मानवाचं हे छोटं पाऊल असलं तरी उभ्या मानवजातीनं घेतलेली ही प्रचंड झेप आहे!'

५. रिकाम्या जागी योग्य शब्द भरा :

(अ) ········व ········पासून संरक्षण मिळावे म्हणून अंतराळवीरांचा पोशाख कापडाच्या एकवीस थरांचा केलेला होता.

(आ) सूर्याचे किरण हवेत असलेल्या········वर पडले की········पसरतो.

(इ) ········शक्तीमुळे कुठलीही वस्तू जमिनीकडे ओढली जाते.



## .२४.

# माझं लहानपण

**प्रा. श्री. म. माटे**

**श्री. म. माटे** (जन्म : १८८६, मृत्यू : १९५७.) यांनी 'माणुसकीचा गहिवर, 'उपेक्षितांचे अंतरंग' ही व इतर अनेक पुस्तके लिहिली आहेत.

पुढे दिलेल्या पाठात श्री. माटे यांनी आपल्या लहानपणची एक आठवण सांगितली आहे.

मी मराठी चौथी इयत्तेत असताना एक गमतीची गोष्ट घडली होती. आमच्या वर्गात फार तर वीस-पंचवीस मुले असतील. त्यामुळे सगळीच मुले एकमेकांचे मित्र असत. वर्गाचे शिक्षक भारी कडक होते. सगळा वर्ग त्यांच्यापुढे चळाचळा कापत असे. असल्या या शिक्षकांच्या हाताखाली वागत असतानासुद्‌धा वर्गात अनेक गोष्टी चालत. आमच्या वर्गात फडणिसांचा मुलगा होता. त्याला आम्ही 'ए फडणीस' म्हणून हाक मारायचे. त्या काळी ती पद्‌धतीच होती. एक पोस्टमास्तराचा मुलगा होता. त्याला 'ए पोस्टमास्तर' म्हणायचे. आणि फौजदाराच्या मुलाला 'ए फौजदार' असे म्हणायचे. यात कोणाला काही वाटत नसे. आमचा हा फडणीस–अर्थात त्याचे काहीतरी निराळे नाव असेलच, पण मला ते आता आठवत नाही–वर्गात सगळ्यांचा मोठा आवडता असे. 'ए फडणीस, फडणीस' म्हणून त्याला सगळ्यांनी ओढायचे किंवा थापट्या मारायच्या. फडणिसाच्या बापाला पन्नास-साठ रुपये पगार होता. आम्हांला वाटे हा केवढा श्रीमंत आहे ! कारण, माझ्या भावाला नऊ रुपये पगार होता. तारळेकराच्या बापाला वीस रुपये होता. पण हा फडणीस श्रीमंताचा मुलगा असला तरी सगळ्या मुलांत मिसळून वागायचा.

एकदा असे झाले, की या फडणिसाला अवदसा आठवली. त्याच्या घरी बापाने छान, गुळगुळीत, पांढऱ्या स्वच्छ तावांचे रीम आणलेले होते. हे बहुधा

त्यांच्या कचेरीतलेच असावे, असा माझा अंदाज आहे. नाहीतर फडणीस-साहेबांना मुद्दाम इतके ताव घरी विकत घेण्याचे काहीच कारण नव्हते. पण सादिलाच्या पोटी ताव, पेन्सिली, बोरू ही वापरण्यात काही चूक आहे असे कोणास वाटतच नसे. आमच्या वर्गातल्या फडणिसाने बापाच्या या रीममधील ताव हलके हलके लांबवायला सुरुवात केली. रोज शाळेत येताना तो दस्ता-अर्धा दस्ता कागद घेऊन यायचा. त्याच्यापासली ही दौलत पाहून वर्गातली मुले हरखून जायची आणि फडणिसांच्या श्रीमंतीविषयीची त्यांची कल्पना अफाट बनत जायची. पोरे चकित झाली म्हणजे हा फडणीस खूष व्हायचा आणि फुगत जायचा. मग त्या ऐटीत घरून आणलेले कागद तो भराभर वाटून टाकायचा. याला दहा दे, त्याला पाच दे असे होता होता दहा-पाच मिनिटांत सगळा दस्ता खलास होऊन जायचा.

ज्यांना कागद मिळाले नसतील ते म्हणायचे, "लेका, फडणीसा, इतके ताव ह्यांना दिलेस अन् आम्हांला काहीच नाही होय?"

दुसरे दिवशी फडणीस आणखी एक दस्ता घेऊन यायचा आणि त्या मागणाऱ्या पोरांना देऊन टाकायचा. मग ती पहिली पोरे म्हणत, "लेका, फडणीसा, एवढ्याशा कागदांनी काय होणार रे? शनवारी पुस्त्या आहेत ना!" मग फडणिसाने तिसरा दस्ता आणायचा. असा रोजगार महिनाभर चालू होता. काही काही पोरे वयाने मोठी होती. ती फडणिसाला फसवत आणि त्याच्याकडून ताव काढत. त्यांनी अशा रीतीने ताव मिळवले होते. त्यांच्या ध्यानात आले होते की हे काही बरे नाही. म्हणून फडणिसाकडून मिळवलेले ताव त्यांनीसुद्धा आपापल्या घरी चोरूनच ठेवले. काय असेल ते असो, या सगळ्या खैरातीत मी कुठेच सापडलो नाही. मला एकदा फडणिसाने विचारले, 'माठ्या लेका, तुला ताव हवेत ना?' मी सांगितले, 'मला नकोत!' आणि मी असे सांगितले हेच बरे झाले.

होता होता घरच्या रिमाची जाडी कमी होत चालली आहे, हे वडिलांच्या ध्यानात आले, पण त्यांनी दुर्लक्ष केले. महिन्याच्या शेवटी रिमावरचा निळा पुठ्ठा अगदी पोकळ झाला आहे असे त्यांना दिसले; तेव्हा मात्र फडणीससाहेब कडाडून उठले आणि ताव काय झाले, म्हणून घरात गर्गशा करू लागले. आमचा

फडणीस आपण त्या गावचेच नव्हे अशा थाटाने गप्प बसला होता. त्याच्या मोठ्या वहिणीला हे सारे माहीत होते; पण ती बापडी गप्प बसली. कारण नानूला चोप बसेल हे तिला माहीत होते. पण तावाला हात लावणारे घरात दुसरे कोणीच नव्हते. म्हणून फडणीससाहेबांनी नान्यावर शिस्त धरली. ते कडकडताच नानू ओक्साबोक्शी रडू लागला. बापाच्या हातचा प्रसाद कसा काय लागतो हे त्याला चांगले माहीत असल्यामुळे वडील जवळ येताच तो म्हणाला, "ताव कुठं आहेत ते सांगतो; मारू नका, मारू नका."

आमच्या फडणिसाने झालेली सारी हकीगत सांगून टाकली. फडणीससाहेब पराकाष्ठेचे संतापले आणि त्यांनी आपल्या जवळच्या एका माणसाला दुसऱ्या दिवशी सकाळी शाळेत धाडले.

हा गृहस्थ असाच कोणीतरी होता, पण आपण फडणिसांच्याकडून आलो आहो म्हणून त्याला मोठी ऐट वाटत होती. त्याने आमच्या मास्तरांना सगळी हकीगत सांगितली आणि तुमच्या वर्गातील मुलांनी फडणीससाहेबांच्या मुलाला फसवून असे असे ताव लांबवले म्हणून सांगितले. शिक्षक म्हणजे नुसते



कर्दनकाळ होते. त्यांनी सगळ्या पोरांना उभे केले आणि दरडावून विचारले, "कोणी कोणी किती किती ताव नेले आहेत?"

गणूने पंचवीस, अबदुलने पंचवीस, दादूने पन्नास, दत्तूने पन्नास अशी भराभर बेरीज होत चालली. माझ्याकडे ते आले तेव्हा मी सांगितले, "गुरुजी, मी मुळीच ताव घेतलेले नाहीत."

त्यांनी फडणिसाला विचारले. तोही बापडा सत्याला जागला आणि म्हणाला, "नाही, माटयाने काही घेतले नाहीत."

सुमारे चारशे तावांची बेरीज लागली. आपल्या नकळत एवढा सौदा झाला याचे शिक्षकांना फारच वैषम्य वाटले. फडणिसांच्या माणसाने सांगितले की, हे आमचे कागद परत मिळाले पाहिजेत. मी कागद घेतले नव्हते म्हणून मी प्रामाणिक ठरलो आणि पोरांच्याकडून कागद-वसुली करण्याचे काम गुरुजींनी आणि त्या आलेल्या माणसाने माझ्याकडे सोपवले. मला मोठीच फुशारकी वाटू लागली. मग शिक्षक गेल्यावर मी त्या पोरांना म्हटले, "तुम्ही आता बऱ्या बोलानं ताव आणून द्या; नाहीतर मग काय होईल ते आपल्याला माहीत आहेच."

बाजारात पैशाला सामान्य प्रतीचे तीन कागद मिळत असत. त्यांच्याऐवजी एवढे चांगले, गुळगुळीत, पांढरे स्वच्छ, जाड कागद फडणिसाकडून मिळालेले! ते या मंडळींनी जपून ठेवले होते. पण हा ससेमिरा मागे लागताच हे प्रकरण वडिलांपर्यंत जाऊ नये म्हणून त्यांनी कागद भराभर परत आणून दिले. तीनशे ताव जमले. दोन-तीन दिवसांत मी गुरुजींना तो गठ्ठा दाखवला. त्यांनाही बरे वाटले. ते म्हणाले, "दुपारी हे कागद घे आणि फडणिसांच्या घरी नेऊन दे."

कागदाचे ओझे बरेच होते; पण काम केल्याची फुशारकी मला वाटत होती. मी ते कागद फडणिसांच्या पुढे नेऊन ठेवले. त्यांनी माझ्याकडे रोखून पाहिले आणि मला लाजवण्यासाठी विचारले, "यांतले तू किती घेतले होतेस?" त्यांचा तो शाळेत आलेला माणूस जवळच बसलेला होता. मी म्हटले, "मी एकसुद्धा ताव घेतलेला नाही."

त्या माणसानेही माझ्या बाजूने साक्ष दिली. आमचा फडणीस आतून हे सारे ऐकत होता. त्यालाही बापाने विचारले. तो म्हणाला, "मला ताव नकोत असं माटे म्हणाला."

फडणीससाहेबांनी पुन्हा एकदा माझ्याकडे बघितले आणि त्यांना काय वाटले कोणास ठाऊक! पण ते मला म्हणाले, "माट्या, जा! हे सारे कागद तुलाच बक्षीस घे!"

फडणीससाहेबांच्या तोंडचे हे शब्द ऐकून मी अगदी थक्कच झालो. आणि म्हटले, "मला बक्षीस?"

"हो, हो, तुला बक्षीस! जा घेऊन!"

मग काय विचारता! ते गोड ओझे मोठ्या आनंदाने डोक्यावर घेतले आणि घरी आणून आईपुढे आदळले. ही सारी हकीगत ऐकून तिलाही बरे वाटले. तेव्हापासून आतापर्यंत मला इतर कसल्याही गोष्टींची कमतरता पडली असली तरी तावांची कमतरता मात्र पडलेली नाही, हा फडणीससाहेबांचा हातगुणच समजला पाहिजे!



**अभ्यास :**

१. फडणिसांचा मुलगा वर्गातल्या मुलांना श्रीमंत का वाटे?
२. फडणिसांच्या मुलाने कोणती चूक केली? त्याला कोणी साथ दिली नाही?
३. हरवलेल्या कागदांचा शोध कोणत्या रीतीने लागला? कागद फडणिसांकडे घेऊन गेल्यावर तेथे काय काय घडले?
४. अर्थ सांगा व वाक्यांत उपयोग करा :—हलके हलके लांबवणे, गर्गशा करणे, सत्याला जागणे, फुशारकी वाटणे, शिस्त धरणे, अवदसा आठवणे.
५. या पाठात कागदासाठी योजलेली विशेषणे कोणती आहेत? त्यांचा उपयोग करून नवीन वाक्ये तयार करा.
६. 'माझी इयत्ता पाचवीमधील एक आठवण' यावर दहा-पंधरा ओळी लिहा.





# .२५. आधी लगीन कोंडाण्याचे

## ह. ना. आपटे

**ह. ना. आपटे** (जन्म : १८६४, मृत्यू : १९१९.) जुन्या पिढीचे एक कथाकार आणि कादंबरीकार. त्यांच्या 'मधली स्थिती', 'पण लक्षात कोण घेतो ?', 'उषःकाल', 'वज्राघात' या व इतरही काही कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत. पुढील पाठ त्यांच्या 'गड आला पण सिंह गेला' या कादंबरीतून घेतला आहे.

स्वराज्याच्या स्थापनेसाठी तानाजीसारख्या शूर वीरांनी कसा स्वार्थत्याग केला, याचे वर्णन हरिभाऊ आपटे यांच्याच शब्दांत वाचा—

तानाजी, शेलारमामा वगैरेंचे स्नान-भोजन झाले, तरी महाराज आपल्या महालातून बाहेर येईनात. हे पाहून सर्व मंडळीस फार अचंबा वाटला. एवढ्यात निरोप आलाही, महाराज अजून एकांत-महालातच आहेत. कोठून तरी पत्र घेऊन आलेला हेजीबही बाहेर आला नाही. तेव्हा ते अर्थातच काहीतरी फार महत्त्वाच्या कामात गुंतले आहेत, असे सर्वांस वाटले. जिजाबाईसाहेब स्वतः पाहुण्यांचा समाचार घेत होत्या.

महाराज आपल्या महालातून इकडे येण्यास निघाल्याची वर्दी आली आणि ते येऊन पोचतात तो तानाजी व शेलारमामा यांचे जेवण संपलेही होते. "आपण आता थकून भागून आला आहा, जरा पडा; मग आपण बोलू याच्यासंबंधानं. तानाजीराव, तुम्ही पाहिजे तर घटकाभर स्वस्थ पडा."

'तुम्ही पाहिजे तर' हे शब्द कानी पडताक्षणी तो हात जोडून महाराजांस म्हणतो, "सरकार, बोलण्याची माफी असावी. पण मघाशी हेजीब आला, त्यानं काहीतरी चिंता उपजविणारी बातमी आणली असावी. महाराज चिंतेत असता तिचं कारण विचारण्याचं सोडून हा तानाजी घटकाभर नाही क्षणभर तरी कसा स्वस्थ पडेल ?"

ते तानाजीचे बोलणे ऐकून महाराज किंचित हसले आणि म्हणाले, "तानाजी, तुला मी सांगणार नव्हतो. तू इथून जाईपर्यंत त्यासंबंधीची गोष्टच बाहेर फोडणार नव्हतो; पण तू माझ्या चर्येवरून ताडलंस, तेव्हा आता सांगितल्या-खेरीज कसं चालणार? आईसाहेब, आपण तिकडे माझ्या दिवाणखान्यात आला तर सांगतो. मामा आपणही चला." असे म्हणून महाराज पुढे झाले आणि त्यांच्या मागोमाग तानाजी व शेलारमामा हे चालले व सगळ्यांच्या मागून जिजाबाईसाहेब आल्या. तेथे महाराजांनी दिल्लीहून आलेला एक कागद काढून चिटणिसास वाचून दाखविण्यास सांगितला.

औरंगजेबाने ज्या काही हेतूने उदयभानूला इकडे पाठविले होते, ते सर्व या पत्रात लिहून कळविले होते. उदयभानू नावाचा कोणी मुसलमान झालेला सरदार अगदी एकाएकी कोंडाण्यावर येऊन राहिला आहे व त्याच्याबरोबर दहा-पाच हजार सैन्य आहे, असे महाराजांना कळले होते. बाळाजी आवजीने ते पत्र वाचून दाखविल्यानंतर काही वेळ महाराज व बाकी सर्व मंडळी स्तब्ध बसली होती. तितक्यात जिजाबाईसाहेब म्हणतात, "मला वाटलं होतं एकदा हा कोंडाणा आपल्याला घेतला पाहिजे. तो हाती असला म्हणजे आजूबाजूचा प्रांत जरी शत्रूच्या हातांत असला तरी हरकत नाही. वाटेल त्या वेळी मारा करता येईल. परवाच्या दिवशी मी अशी उभी होते. माझी नजर समोर कोंडाण्यावर गेली, आणखी वाटलं, की तुला एकदा सांगावं, की हा किल्ला एवढा घेऊन आपलं लष्कर त्यावर ठेव. त्याखेरीज काही आपला बंदोबस्त ठीकठाक बसायचा नाही."

"आईसाहेब, आपण म्हणता त्या गोष्टी खऱ्या. पण आजपर्यंत तह मोडण्याला काही सबब नव्हती. आता उदयभानूबरोबर मुद्दाम लष्कर देऊन पाठवलं आहे. तेव्हा 'आपला हेतू बरा दिसून येत नाही', असे बादशाहाला म्हणून आपल्याला काय करायचं ते करायला मुळीच हरकत नाही."

ते महाराजांचे बोलणे ऐकून तानाजी एकदम जरा पुढे सरून म्हणतो, "सरकार, आपल्याला मी फार दिवस विनंती करणार होतो, की आपण आता कोणत्याही मोहिमेत पुढे होत जाऊ नये. माझ्यासारखे नोकर बाळगायचे ते

कशाला ? महाराज, आपण आघाडीला जाऊन जर काही वेडंवाकडं झालं तर—"

"तानाजीराव, तुमच्यासारख्यांचे प्राण आणखी माझे प्राण यांत कसलं अंतर आहे ?"

"महाराज, माझ्या प्राणात आणि आपल्या प्राणात अंतर विचारता होय ? सरकार, आपल्या प्राणांचं बरंवाईट झालं तर ही स्वराज्याची एवढी थोरली प्रचंड इमारत शत्रूला मोडूनतोडून टाकायला यत्किंचितसुद्धा वेळ लागायचा नाही. आणखी माझ्यासारखा गेला, तर एखादी वीट पडल्यासारखंदेखील वाटायचं नाही. आपण मला आज्ञा करा. मी जाऊन हा किल्ला सर करून देतो."



"तानाजीराव, तुम्ही कराल की नाही याबद्दल मला मुळीच शंका नाही. पण तुम्ही आपल्या मुलाचं लगीन काढलं आहे, तेव्हा ते कार्य होईपर्यंत आपल्याला मी काही सांगणार नाही. त्याकरिता मी स्वतःच जाण्याचा निश्चय केला आहे."

"लगीन ? महाराज, आपल्यासारख्या स्वामींच्या कार्यापुढं मुलाचं लगीन म्हणजे काय गोष्ट आहे ? सरकार, आधी कोंडाण्याचं लगीन उरकीन, मग रायबाच्या लग्नाला आपल्याबरोबर जाईन. शेलारमामा, तू परत जा आणि सूर्याजीला म्हणावं आपलं सगळं लष्कर घेऊन इकडं ये. महाराज, कोंडाणा किल्ला सर करून येईनच. मग आता पुढे काय बोलायचं ते बोलेन, पण माफी असेल, तर एक विनंती आहे..."

"काय विनंती आहे ?" महाराज अत्यंत कौतुकाने तानाजीकडे पाहात म्हणाले.

"विनंती एवढीच की, मी किल्ला सर करीपर्यंत आपण या रायगडा-वरून हलायचं नाही. मी काय युक्त्या करीन, कोठून काय संधानं बांधीन ते आपल्याला वेळोवेळी कळवीन व आपला सल्ला घेतल्याखेरीज काही करणार नाही. आपल्या पायांवर हात ठेवून प्रतिज्ञा करतो, की आजपासून दहा दिवसांच्या आत कोंडाणा घेऊन आपल्या पायांपाशी येतो."

तानाजीचे हे बोलणे इतके आवेशयुक्त होते, की शिवाजीमहाराजदेखील क्षणभर अगदी स्वस्थ बसले. नंतर तानाजीस म्हणतात, "तुझ्या घरी लगीन निघालं म्हणून तू आमंत्रण करायला आलास, आणखी इथं येण्याबरोबर ते लगीन एका बाजूला ठेवून तुला असल्या कामगिरीवर पाठवलं तर लोक म्हणतील तरी काय ! हे शेलारमामाच काय म्हणतील ते विचार की यांना ! ते काही नाही...."

परंतु शेलारमामा एकदम म्हणतात, "तान्या, आपल्या कुळाचं नाव राख-लंस पोरा. महाराज, सोराज्याचं काम आधी का पोराचं लगीन आधी ? मी तानाजीबरोबरच जाणार गड घ्यायला. सरकार, गड आपला झाला म्हणून समजा !"

म्हाताऱ्याचा त्या वेळचा आविर्भाव तर फारच विलक्षण होता. तो पाहून जिजाबाईसाहेबांस किंचित हसूसुद्धा आले आणि त्या आपल्या मुलाकडे पाहून म्हणतात, "बाबारे, असल्या या लोकांच्या हिमतीनं आणखी आशीर्वादानं तुझं राज्य चाललं आहे बरं. आपल्या राज्याचे हे खांब किती जरी जुने झाले तरी त्यांची किंमत फार मोठी!" शेलारमामा लागलीच त्यावर म्हणतात, "मावशी, हे सारं तुमच्या आशीर्वादाचं फळ आहे. आता आम्ही इथून जाणार. रायबा तिकडं निजला असेल. त्याला आता आपल्या ओटयात घातला आहे. गड सर करून येऊ आणि मग त्याला नेऊ."

तितक्यात तानाजी उठलाच. त्याने एकवार महाराजांना व आईसाहेबांना दंडवत घातले आणि त्यांचा आशीर्वाद व महाराजांच्या हातचा विडा घेऊन तो व मामा दोघेही जाण्यास सिद्ध झाले.

हेजीब – दूत.

अभ्यास :

१. महाराजांना महालातून बाहेर यायला उशीर का झाला?
२. दूताने आणलेली बातमी तानाजीस सांगू नये असे महाराजांना का वाटले?
३. शिवाजीमहाराजांच्या ऐवजी आपणच मोहिमेवर जावे असा आग्रह तानाजीने का धरला?
४. 'आपल्या राज्याचे खांब किती जरी जुने झाले तरी त्यांची किंमत फार मोठी!' असे जिजाबाई का म्हणाल्या?
५. वाक्यांत उपयोग करा – आवेशयुक्त, क्षणभर, प्रतिज्ञा, सबब, आविर्भाव.
६. हा प्रसंग संवादरूपाने लिहून काढा व तो वर्गात करून दाखवा.



# २६. गांधीदर्शन

महात्मा गांधींची थोरवी सांगणाऱ्या पुष्कळ गोष्टी आहेत. कितीतरी लेखकांनी त्यांच्यासंबंधीच्या या गोष्टी सांगितल्या आहेत. साने गुरुजी, मनू गांधी आणि लल्लूभाई मकनजी यांनी सांगितलेल्या काही गोष्टी या पाठात दिल्या आहेत. यावरून गांधीजी किती साधेपणाने वागत, लोकांची सेवा किती मनापासून करीत, याची कल्पना येईल. गांधीजींच्या अशा अनेक गुणांमुळे जगात त्यांच्याविषयी किती आदर निर्माण झाला होता, हे इथे दिलेल्या शेवटच्या उताऱ्यावरून तुमच्या लक्षात येईल.

१

## पोषाखातील क्रांती

—साने गुरुजी

गांधीजींचा पोषाख हा एक इतिहासच आहे. दक्षिण आफ्रिकेत प्रथम ते कॉलर, नेकटाय वगैरे साहेबी पोषाख करत असत. परंतु पुढे त्यांचे जीवन अगदी साधे झाले. ते एक सदरा व पायजमा वापरत असत. कधी मद्रासी लोकांप्रमाणे ते लुंगीही गुंडाळत असत.

परंतु १९१४ च्या अखेरीस गांधीजी भारतात परत आले, ते काठेवाडी पोषाखात. ते अंगरखा घालत. कमरेला धोतर, अंगावर उपरणे, डोक्याला काठेवाडी फेटा असा त्यांचा पोषाख असे. एकदा आगगाडीतून ते जात होते. जवळच्या माणसाला 'तुम्ही खादी का वापरत नाही ?' वगैरे ते विचारत होते. त्या माणसाने म्हटले, "तुमच्याइतके खादीचे कपडे मी वापरू लागलो तर माझं दिवाळंच निघेल."



VAKILS, BOMBAY-1

महात्माजी विचार करू लागले....एवढा फेटा कशाला? या एका फेटयाच्या दहा टोप्या होतील! आणि हा लांब अंगरखा आणि उपरणे, हे पायघोळ धोतर हे सारे कशाला? गुंडयांचा एक सदरा व लहान धोतर ते पुढे वापरू लागले. यानंतर गांधीटोपीचा जन्म झाला. स्वातंत्र्याची ती निशाणी बनली. ही स्वच्छ पांढरी टोपी धुता येते. पांढऱ्या टोपीचे मळणे पटकन समजते.

परंतु पुढे गांधीजींनी टोपीसदराही टाकला. बदलायला दुसरे वस्त्र नाही म्हणून ज्यांना स्नान करता येत नाही, अशा आयाबहिणी ओरिसा प्रांतात त्यांनी पाहिल्या. बिहारमध्ये चंपारण्यातही असे दारिद्र्याचे दर्शन झाले. महात्माजी म्हणाले, "मलाही एका वस्त्राने राहू दे." आणि तेव्हापासून ते कमरेभोवती फक्त पंचा गुंडाळू लागले. ते उघडेच असत. क्वचित खादीचे उपरणे अंगावर घेत असत.

गरिबांच्या जीवनाशी समरस झालेले असे त्यांचे जीवन होते.

२

## मी साधा सेवक आहे!

—मनू गांधी

१९४७ साली हातपाय गारठून टाकणाऱ्या थंडीत आम्ही नौखालीत पदयात्रा करत होतो. चालता चालता एकदा आम्ही एका गावात पोहोचलो. तेथे एका घरात एक नऊ-दहा वर्षांची मुलगी भयंकर आजारी होती. ती बिचारी फारच अशक्त झाली होती. आम्ही दोघे तिला पाहण्यासाठी गेलो. त्या मुलीजवळ बसलेल्या स्त्रिया बापूंना पाहून घुंगट घेऊन आत निघून गेल्या.

आता ती आजारी मुलगी बिचारी एकटीच राहिली. झोपडीच्या बाहेरच्या भागात तिला निजवले होते.

मी त्या स्त्रियांना समजवण्यासाठी घरात गेले व सांगू लागले, "पाहा तर खरं, तुमच्या अंगणात एक संतपुरुष आले आहेत. तुम्ही बाहेर येऊन त्यांचे



दर्शन तरी घ्या !" पण माझ्या दृष्टीने जे महान पुरुष होते ते त्यांच्या दृष्टीने त्यांचे शत्रू होते. त्यांच्या मनात बापूंबद्दल मुळीच आदर नव्हता.

आत जाऊन मी त्या स्त्रियांची समजूत घालून बाहेर येते, तो मला काय दिसले? बापूंनी त्या मुलीच्या अंगाखालची मळकी, घाणेरडी चादर काढून टाकून त्या जागी आपल्या स्वतःच्या अंगावरचा कपडा अंथरला होता. आपल्या छोट्या रुमालाने तिचे नाक साफ केले होते. पाण्याने तिचे तोंड धुऊन टाकले होते. आपली शाल तिच्या अंगावर घातली होती व कडक थंडीत उघड्या अंगाने ते तिच्या तोंडावरून प्रेमाने हात फिरवत होते.

दुपारी दोन-तीन वेळा त्या मुलीला मध-पाणी देण्याकरता बापूंनी मला पाठवले व तिच्या पोटावर, डोक्यावर मातीच्या पट्ट्या ठेवायला सांगितले. रात्री त्या मुलीचा ताप पार उतरला. घरातल्या ज्या स्त्रिया बापूंना शत्रू समजत होत्या, त्यापण मोकळ्या मनाने, भक्तिभावाने त्यांना प्रणाम करायला आल्या. त्या म्हणाल्या, "आपण खरोखरच देवदूत आहात. आमच्या मुलीसाठी आपण

जो त्रास घेतलात त्याबद्दल आम्ही आपली कोणती सेवा करावी ?"

बापू म्हणाले, "मी एक साधा सेवक आहे ! मी देवदूतही नाही किंवा पैगंबर पण नाही ! हो, सेवा करणं मला फार आवडतं. ह्या मुलीचा ताप आज उतरलां याचं यश माझं नाही. आज मी तिला स्वच्छ केलं व थोडी थोडी ताकद वाढवणारा खुराक दिला, म्हणून तिचा ताप उतरला. पण तुम्हांला खरोखर उतराई व्हावं असं वाटत असेल तर मी तुम्हांला इतकं सांगतो, की तुम्ही स्वतः निर्भय बना व दुसऱ्यालाही निर्भय बनवा. हे जग परमेश्वराचं आहे व आपण सर्व त्याची लेकरं आहोत."

३

## बोलके लिफाफे

—लल्लुभाई मकनजी

१

टपालातून जी पत्रे पाठवली जातात त्यावर पूर्ण व निश्चित पत्ता लिहिलेला असला तर ती पत्रे त्या त्या व्यक्तींना बरोबर मिळतात. पत्ता अपुरा असला, थोडीशी जरी त्यात चूक असली, तरी मग त्यात घोटाळा होण्याचा संभव असतो.

गांधीजींना जगाच्या कानाकोपऱ्यांतून पत्रे येत. गांधीजींचा नेमका पत्ता कित्येकांना माहीत नसायचा. गांधीजी प्रवासही खूप करत. पुष्कळ वेळा आगगाडीचा तिसऱ्या वर्गाचा डबा हेच त्यांचे घर व कचेरी बने. त्यामुळेही पत्रे लिहिणारांची मोठी पंचाईत व्हायची. परदेशांतून आलेल्या काही पत्रांवरील पत्ते मोठे गमतीचे असत. ते पत्ते शोधता शोधता टपालखात्याचे तर हालच होत. पण या पत्त्यांवरून परदेशांतील लोकांच्या मनांत गांधीजींबद्दल कोणत्या भावना होत्या हे चांगले स्पष्ट होते. काही लिफाफ्यांवरील पत्ते खाली दिले आहेत.

१. भारताचा राजा,
दिल्ली, भारत.

२. महात्मा गांधी,
शेतकरी व विणकर,
मुंबई.

३. जगाचे सेवक,
महात्मा गांधीजी,
वर्धा.

एकदा एका परदेशी कलावंताला गांधीजींना पत्र पाठवण्याची इच्छा झाली. पण पत्ता माहीत नव्हता. त्याने लिफाफ्यावर गांधीजींचे चित्रच काढले आणि फक्त एवढेच लिहिले—**चित्रातील व्यक्तीला, भारत.**

डाकखात्यातील सर्व कर्मचारी या चित्रातल्या माणसाला ओळखत होते. ते पत्र गांधीजींना बरोबर मिळाले.

२

सर्व भारतीयांच्या हृदयात निवास करणाऱ्या गांधीजींचा पत्ता तरी कोणता असू शकणार? त्यांचा पत्ता शोधून काढणे डाकखात्याचे जणू कर्तव्यच होते. गांधीजींना लिहिलेले पत्र चुकीच्या ठिकाणी जाऊच शकत नाही, ते त्यांना मिळतेच मिळते अशी विलक्षण श्रद्धा मनात बाळगून एकाने लिफाफ्यावर खालील पत्ता लिहिला होता—

महात्मा गांधी,
वर्धा किंवा जेथे असतील तेथे.

हेही पत्र गांधीजींना मिळालेच!

कोट्यवधी जनता गांधीजींच्या साधुवृत्तीमुळे आकर्षित झाली होती. ते भारताचेच नव्हे, तर साऱ्या विश्वाचे संत होते. गांधीजींविषयींच्या ह्या पवित्र भावनेचे प्रतिबिंब एका साध्यासुध्या खेडुताने लिहिलेल्या पत्त्यात दिसून येते.

तो पत्ता असा—

दुनियाके भगत,
श्री. महात्मा गांधी,
वर्धा.




दिवाळे निघणे—खूपच खर्च होऊन गरिबीची स्थिती येणे. घुंघट—तोंडावर घेण्याचे वस्त्र.

**अभ्यास :**

१. महात्मा गांधींच्या पोषाखात कसकसा बदल झाला? त्यांनी तो बदल का केला?
२. नौखालीत असताना गांधीजींनी केलेल्या कोणत्या सेवेचे वर्णन श्रीमती मनूबेनने केले आहे? या सेवेचा परिणाम काय झाला?
३. परदेशांतून आलेल्या पत्रांच्या पत्त्यांवर महात्मा गांधींसाठी कोणकोणते शब्द वापरले आहेत?
४. महात्मा गांधींनी नौखालीतील स्त्रियांना काय सांगितले?
५. दारिद्र्य, खुराक, कर्मचारी, भगत यांचा अर्थ सांगा व त्यांचा वाक्यांत उपयोग करा.
६. 'बापूजींच्या गोड गोष्टी' ही साने गुरुजींची पुस्तके वाचा.



१.

# चांदूमामा डोकावतो

## शांता शेळके

**शांता शेळके** (जन्म : १९२१.) या सध्या मुंबई येथे मराठीच्या प्राध्यापिका आहेत. कविता, कथा, कादंबऱ्या असे पुष्कळ लेखन त्यांनी केले आहे. वर्षा, रूपसी हे कविता संग्रह, चिमणचारा, टिपटिप चांदणी हे बालगीतांचे संग्रह व त्यांची इतरही काही पुस्तके प्रसिद्ध आहेत.

पुढील कवितेत त्यांनी बालपणच्या सुखद आठवणी रेखाटल्या आहेत.

चांदूमामा डोकावतो लिंबोणीच्या झाडातून
सय बाळपणाची ग येते याजला देखून

मायमाउलीने मला ह्याच चांदोबा दावीत
कडेवर घेउनीया भरविला दूधभात

माझ्या मामाचा आठवे मला चिरेबंदी वाडा
अंगणात सये बाई! खेळले मी दुडदुडा

काय सांगू बाळपणी किती भोगियले सुख
काय सांगू आजोळचे सये, तुला मी कौतुक?

आजाआजींची लाडकी नात नव्या नवसाची
होते तशीच लाडकी भाची माझिया मामाची

लेत होते मोतियांची बाई, बिंदी या भांगात
नेसले मी चंद्रकळा चोळी खडीची अंगात

पायी लेवूनीया तशा वाळे साखळ्या तोरड्या
अंगणात खेळले मी झिम्मा आणिक फुगड्या

तेव्हाही ग डोकावून लिंबोणीच्या झाडातून
चांदूमामाने पाहिले खेळ आमुचे हासून

किती निश्चिंत होते मी ममतेच्या त्या छायेत
देव्हाऱ्यात तेवणारी जणू समयीची ज्योत !



सय – आठवण, सये – सखे, बिंदी – एक अलंकार, तोरड्या – पायांत घालावयाचा एक दागिना.

अभ्यास :

१. लिंबोणीच्या झाडातून डोकावणाऱ्या चांदूमामास पाहून कवयित्रीस बालपणच्या कोणकोणत्या आठवणी येतात?
२. कवयित्रीचे आजोळी कसकसे कौतुक होत असे?
३. बालपणच्या सुखी जीवनाची तुलना कशाशी केली आहे ?
४. कवितेत वर्णन केलेल्या बाळपणच्या या आठवणी तुमच्या शब्दांत लिहा.



.२.

# घाल घाल पिंगा वाऱ्या

**कृ. ब. निकुंब**

**कृ. ब. निकुंब** (जन्म : १९२०.) हे बेळगावला मराठीचे प्राध्यापक आहेत. 'उज्ज्वला', 'उर्मिला', 'सायसाखर' व 'अनुबंध' हे त्यांचे कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत. पुढील कविता त्यांच्या 'उज्ज्वला' या कवितासंग्रहातून घेतली आहे.

सासरी असलेल्या मुलीला माहेरची कशी ओढ वाटते, हे त्यांनी अत्यंत भावपूर्ण शब्दांत या कवितेत व्यक्त केले आहे.

घाल घाल पिंगा वाऱ्या, माझ्या परसात
माहेरी जा, सुवासाची कर बरसात!
"सुखी आहे पोर," सांग आईच्या कानात–
"आई, भाऊसाठी परी मन खंतावतं!
विसरली का ग? –भादव्यात वर्स झालं
माहेरीच्या सुखाला ग मन आचवलं.
फिरून् फिरून् सय येई, जीव वेडावतो
चंद्रकळेचा ग शेव ओलाचिंब होतो!

काळ्या कपिलेची नंदा खोडकर फार
हुंगहुंगूनीया करी कशी ग बेजार!
परसात पारिजातकाचा सडा पडे
कधी फुलं वेचायला नेशील तू गडे!
कपिलेच्या दुधावर मऊ दाट साय
माया माझ्यावर दाट जशी तुझी माय....!"
आले भरून् डोळे पुन्हा गळा नि दाटला
माऊलीच्या भेटीसाठी जीव व्याकुळला!
घाल घाल पिंगा वाऱ्या! माझ्या परसात
माहेरी जा, सुवासाची कर बरसात!



पिंगा—मुलींचा एक खेळ, मन खंतावतं–मन खिन्न होते, आचवलं–मुंकलं, शेव–पदर.

अभ्यास :

१. सासरी असलेल्या मुलीला माहेरच्या कोणकोणत्या आठवणी येतात?
२. तिच्या मनाला कशाचे दुःख होत आहे? तिचे दुःख वर्णन करणाऱ्या कवितेतील ओळी कोणत्या?
३. कवीने आईच्या मायेची कोणत्या वस्तूशी तुलना केली आहे?



.३.

# वारूळ

## श्रीकृष्ण पोवळे

**श्रीकृष्ण पोवळे** (जन्म: १९२१.) 'अग्निपराग' व 'जळमाती' हे त्यांचे काव्यसंग्रह प्रसिद्ध आहेत.

'वारूळ' ही त्यांची पुढे दिलेली कविता वाचा. कवितेचा विषय अगदी साधाच; पण कवीने तो कसा रेखाटला आहे, पाहा.



वारूळ, वारूळ मुंग्यांचे वारूळ
कृमी-कीटकांनी बांधिले देऊळ;
मृत्तिकेचा कण एकेक घेऊन,
स्वतंत्र दुर्गम, बांधिले भुवन.
तुफान-वाऱ्याला ऊन-पावसाला
द्यावया आव्हान बांधिले कष्टून;
आणि कण कण जमविले अन्न
कष्टाळू, भंगूर, क्षणायू जीवन.
परंतु जीवांनो ! तुम्ही वारूळात
जीवनाचे सुख आहात भोगीत;
असेल लाभत मायेचा उबारा
आणिक संकटी मित्रांचा निवारा.

स्वातंत्र्याचे वारे तुम्ही सेवणारे
तुम्हां कोण म्हणे 'दुर्बळ विचारे !'
तुमच्या मनाचे तुम्ही मुखत्यार
वारुळात तुम्ही स्वतःच ईश्वर.
वारुळात नसे शत्रूंना प्रवेश
सत्कारार्थ त्यांच्या लक्षावधी दंश;

परी कधी येता सर्पाचे संकट
दुर्बळांना येई सामर्थ्य अफाट !
कोट्यवधी जीव पडती तुटून
लक्षावधी जीव जाती चिरडून.
स्वातंत्र्याचे अंगी संचरून वारे
हरविती अंती सर्पांना माघारे.



भंगूर – नाश पावणारे, क्षणायु – क्षणाचे आयुष्य असणारे.

**अभ्यास :**

१. कृमिकीटकांचे देऊळ कोणते? ते त्यांनी कशासाठी बांधले आहे?
२. वारुळातील जीवांना 'स्वतःच ईश्वर' असे का म्हटले आहे?
३. वारुळातील मुंग्यांना कोणापासून भय असते? त्यापासून त्या स्वतःचा बचाव कसा करतात?
४. या कवितेत मुंग्यांच्या जीवनाबद्दल कोणती विशेष माहिती मिळते?
५. कृमी, मृत्तिका, दुर्गम, दुर्बळ या शब्दांचे अर्थ सांगा.





.४.

# श्रावणमासी हर्ष मानसी—

## बालकवी

त्र्यंबक बापूजी ठोमरे (जन्म : १८९०, मृत्यू : १९१८.) १९०७ च्या जळगाव येथील कविसंमेलनात त्यांना 'बालकवी' ही पदवी मिळाली. 'बालकवींची कविता' हा त्यांचा काव्यसंग्रह. निसर्गाच्या बहारदार वर्णनांनी त्यांची कविता नटलेली आहे.

पुढील कवितेत बालकवींनी श्रावणमासातील निसर्गरम्य शोभेचे कसे बहारदार वर्णन केले आहे, ते पाहा.

श्रावणमासी हर्ष मानसी हिरवळ दाटे चोहिकडे;
क्षणात येते सरसर शिरवे क्षणात फिरुनी ऊन पडे.
वरती बघता इंद्रधनूचा गोफ दुहेरी विणलासे,
मंगल तोरण काय बांधिले नभोमंडपी कुणि भासे!
झालासा सूर्यास्त वाटतो सांज अहाहा! तो उघडे
तरुशिखरांवर, उंच घरांवर पिवळे पिवळे ऊन पडे
उठती वरती जलदांवरती अनंत संध्याराग पहा;
सर्व नभावर होय रेखिले सुंदरतेचे रूप महा.
बलाकमाला उडता भासे कल्पसुमांची माळचि ते,
उतरुनि येती अवनीवरती ग्रहगोलचि की एकमते.

फडफड करुनी भिजले अपुले पंख पाखरे सावरिती;
सुंदर हरिणी हिरव्या कुरणी निजबाळांसह बागडती.
खिल्लारे ही चरती रानी, गोपहि गाणी गात फिरे,
मंजुळ पावा गात तयाचा श्रावणमहिमा एकसुरे.
सुवर्णचम्पक फुलला, विपिनी रम्य केवडा दरवळला,
पारिजातही बघता भामा, रोष मनीचा मावळला !
सुंदर परडी घेउनि हाती पुरोपकंठी शुद्धमती,
सुंदर बाला या फुलमाला, रम्य फुले-पत्री खुडती.
देवदर्शना निघती ललना, हर्ष माइना हृदयात,
वदनी त्यांच्या वाचुनि घ्यावे श्रावण महिन्याचे गीत !

शिरवे – पावसाची सर, बलाकमाला– बगळ्यांची रांग, विपिनी– अरण्यात, पुरोपकंठी –नगराजवळील बागेत, भामा–सत्यभामा, श्रीकृष्णाची पत्नी.

अभ्यास :

१. श्रावण महिन्यातील कोणकोणत्या सुंदर दृश्यांची वर्णने या कवितेत आढळतात ?
२. कवितेत वर्णन केलेल्या निसर्गाच्या शोभेचा आनंद कोणाकोणाला झालेला दिसतो ?
३. इंद्रधनुष्य, संध्याराग, बलाकमाला यांवर कवीने कोणत्या कल्पना केल्या आहेत ?
४. 'सुंदर बाला या फुलमाला' यात सारख्या वर्णांचा उपयोग अधिक केल्यामुळे गोड नाद निर्माण होतो. अशा आणखी ओळी शोधा.
५. दिवाळीच्या वेळी नटलेल्या शिवाराच्या शोभेचे वर्णन दहाबारा वाक्यांत करा.



.५.

# शिवराय आणि बालवीर

## वा. भा. पाठक

**प्रा. वा. भा. पाठक** (जन्म-१९०५.) पुणे येथील वाडिया कॉलेजमध्ये मराठीचे प्राध्यापक होते. 'आशागीत' व 'प्रवासी' हे त्यांचे कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत. पुढील कविता त्यांच्या आशागीत या संग्रहातून घेतली आहे.

कर्तव्यनिष्ठ सावळयाचे व गुणग्राहक शिवरायाचे त्यांनी या कवितेत कसे बहारदार वर्णन केले आहे पाहा!

**सावळया :**

खबरदार, जर टाच मारुनी जाल पुढे, चिंधडया
उडविन राइ राइ एवढया !
कुण्या गावचे पाटिल आपण कुठे चालला असे
शीव ही ओलांडुनि तीरसे ?
लगाम खेचा हा घोडीचा राव, टांग टाकुनी
असे या तुम्ही खडया अंगणी !
पोर म्हणूनी हसण्यावारी वेळ नका नेउ ही
मला का ओळखले हो तुम्ही ?

हा मर्द मराठ्याचा मी बच्चा असे,
हे हाडहि माझे लेचेंपेचे नसे
या नसानसांतुन हिंमतबाजी वसे
खबरदार, जर टाच मारुनी जाल पुढे, चिंधड्या
उडविन राइ राइ एवढ्या !

स्वार :

मळ्यात जाउन मोटेचें ते पाणि धरावे तुवा
कशाला ताठा तुज हा हवा ?
मुठीत ज्याच्या मूठ असे ही खड्गाची तो बरे
वीर तू समजलास काय रे ?
थोर मारिसी अशा बढाया पराक्रमाच्या जरी
कुठे तव भालाबरची तरी ?
हे खड्गाचे बघ पाते किति चमकते
अणकुचीदार अति भाल्याचे टोक ते
यापुढे तुझी वद हिंमत का राहते ?
खबरदार, जर पुढती पाउल टाकशील चिंधड्या
उडविन राइ राइ एवढ्या !

सावळ्या :

आपण मोठे दाढीवाले अहा वीर बायकी
किती ते आम्हांला ठाउकी !
तडफ आमुच्या शिवबाजीची तुम्हां माहिती न का ?
दाविता फुशारकी का फुका ?
तुम्हांसारखे कितीक असतिल लोळविले नरमणी
आमुच्या शिवबाने भर रणी.

मी असे इमानी चेला त्यांचेकडे
हुकुमाविण त्यांच्या समजा याचेपुढे
देई न जाउ मी शूर वीर फाकडे
पुन्हा सांगतो खबरदार जर जाल पुढे, चिंधड्या
उडविन राइ राइ एवढ्या !

लालभडक ते वदन जाहले बाळाचे मग कसे
स्वार परि मनी हळू का हसे ?
त्या बाळाच्या नयनी चमके पाणी त्वेषामुळे
स्वार परि सौम्य दृष्टीने खुले.
चंद्र दिसे जणु, एक दूसरा तपतो रवि का तर
ऐका शिवबाचे हे स्वर—
"आहेस इमानी माझा चेला खरा
चल इनाम घे हा माझा शेला तुला
पण बोल सावळ्या बोल पुन्हा एकदा,
खबरदार, जर टाच मारुनी जाल पुढे, चिंधड्या
उडविन राइ राइ एवढ्या !"

शीव – हद्द, मर्यादा, चेला – शिष्य.

**अभ्यास :**

१. सावळ्याने शिवाजीमहाराजांना का अडवले? त्यावरून त्याचा कोणता गुण दिसतो?
२. स्वार व सावळ्या हे कवीला कोणाकोणासारखे वाटले?
३. सावळ्याच्या शौर्याचे वर्णन करणाऱ्या ओळी शोधून काढा. त्यांतील आशय तुमच्या शब्दांत लिहा.
४. वाक्यांत उपयोग करा : टाच मारणे, चिंधड्या उडवणे, बढाई मारणे.

.६.

# एक खेडे

केशवसुत



कवी केशवसुत यांचे संपूर्ण नाव **कृष्णाजी केशव दामले** (जन्म : १८६६, मृत्यू : १९०५.) त्यांच्या 'तुतारी', 'स्फूर्ति', 'झपूर्झा', 'हरपले श्रेय' या व इतरही अनेक कविता प्रसिद्ध आहेत. इथे दिलेली 'एक खेडे' ही कविता त्यांच्या 'केशवसुतांची कविता' या पुस्तकातून घेतली आहे.

हे खेडे आहे कोकणातले. या खेड्यात एक झोपडे बांधून राहावे असे कवीला वाटते. या खेड्याचे त्यांना एवढे आकर्षण का वाटत होते ? त्यांची ही कविता वाचा म्हणजे कळेल.

सह्यगिरिच्या पायथ्याला सुपीक
रम्य खोरे कोकणामधी एक;
नदी त्यामधुनी एक वाहताहे,
एक खेडे तीवरी वसुनि राहे.

उंच नाहित देवळे मुळी तेथे
परी डोंगर आहेत मोठमोठे;
देवळी त्या देवास बळे आणा
परी राही तो सृष्टिमधे राणा.

उंच डोंगर ते, उंच कडे भारी,
पडे धो! धो! ज्यांचियावरुनि वारी,
भोवताले रान ते दाट आहे
अशा ठायी देव तो स्वये राहे!

अहा! अज्ञात स्थळी अशा, माते,
एक गवतारू खोप रहायाते,
शेतवाडी एक ती खपायाला,
लाधती, तर किति सौख्य मन्मनाला!

शेत नांगरणे-पेरणे सुखाने,
फूलझाडे वाडीत शोभवीणे;
गुरेढोरे मी बाळगुनी काही,
दूधदुभते ठेवितो घरी पाही.

कधी येता पाहुणा जर घराला,
'तुझे घर हे', वदतोच मी तयाला;
गोष्टि त्याच्या दूरच्या ऐकुनीया,
थक्क होतो मी मनी तया ठाया.

तेथ गरजा माझिया लहान्या त्या
सहजगत्या भागुनी सदा जात्या;
म्हणुनि माझे जग असे तेचि खोरे
सुखी मजला राखिते चिर अहा रे!

खोरे–नदीच्या दोन्ही बाजूंचा सुपीक प्रदेश, वारी–पाऊस, गवतारू–गवताची.

अभ्यास :

१. कवितेत वर्णन केलेले खेडे कोणत्या परिसरात वसले आहे? खेडयाच्या आजूबाजूला कोणत्या ठळक गोष्टी आहेत?
२. त्या खेडयाला अज्ञात स्थळ असे का म्हटले आहे?
३. कोणत्या गोष्टींचे सौख्य त्या ठिकाणी मिळते, असे कवीने सांगितले आहे?
४. तुम्ही पाहिलेल्या कोणत्याही एका सुंदर स्थळाचे बारा-पंधरा वाक्यांत वर्णन लिहा.

श्री चावुण्डराजें करवियलें

.७.

# माझी मराठी

## वि. म. कुलकर्णी

**डॉ. वि. म. कुलकर्णी** (जन्म १९१७.) हे सोलापूर येथे मराठीचे प्राध्यापक आहेत. 'पहाटवारा', 'कमळवेल' हे त्यांचे कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत.

आपल्या मायबोलीचा यथार्थ अभिमान पुढील कवितेत सोप्या व रसाळ शब्दांत कसा व्यक्त झाला आहे, हे पाहा.

माझ्या मराठीची गोडी
मला वाटते अवीट
माझ्या मराठीचा छंद
मना नित्य मोहवीत !

ज्ञानोबांची तुकयांची
मुक्तेशांची जनाईची
माझी मराठी चोखडी
रामदास–शिवाजीची

'या रे, या रे अवघे जण
हाक मायमराठीची
बंध खळाळा गळाले
साक्ष भीमेच्या पाण्याची !

डफ–तुणतुणे घेऊन
उभी शाहीर मंडळी
मुजऱ्याची मानकरी
वीरांची ही मायबोली

नांगराचा चाले फाळ
अभंगाच्या तालावर
कोवळीक विसावली
पहाटेच्या जात्यावर !

हिचे स्वरूप देखणे
हिची चाल तडफेची
हिच्या नेत्री प्रभा दाटे–
सात्त्विकाची – कांचनाची !

कृष्णा-गोदा-सिंधुजळ
हिची वाढविती कांती
आचार्यांचे आशीर्वाद
हिच्या मुखी वेद होती.



—माझ्या मराठीची थोरी
नित्य नवे रूप दावी
अवनत होई माथा
मुखी उमटते ओवी !



**अभ्यास :**

१. मराठी भाषेची गोडी अवीट आहे, हे सांगण्यासाठी कवीने कोणकोणती उदाहरणे दिली आहेत ?
२. कोणत्या प्रकारची गीते गाताना डफ-तुणतुणे यांचा उपयोग केला जातो ?
३. 'हिचे स्वरूप देखणे, हिची चाल तडफेची' या ओळींचा अर्थ समजावून घ्या.
४. 'कृष्णा–गोदा–सिंधुजळ, हिची वाढविती कांती' या ओळींतून कोणता बोध होतो ?
५. 'मराठी असे आमुची मायबोली' ही माधव ज्युलियन् यांची कविता मिळवून वाचा.





.८.

# झाशीवाली

**भा. रा. तांबे**

**भा. रा. तांबे** (जन्म : १८७३, मृत्यू : १९४१.) हे ग्वाल्हेर संस्थानचे राजकवी होते. 'तांबे यांची समग्र कविता' हा त्यांचा कवितासंग्रह प्रसिद्ध आहे. त्यांची काव्यरचना मधुर आहे. ती तालासुरावर गाता येते.

'झाशीवाली' ही कविता राणी लक्ष्मीबाईच्या स्मारकावर कोरलेली आहे.

रे हिंदबांधवा, थांब या स्थळी अश्रु दोन ढाळी,
ती पराक्रमाची ज्योत मावळे इथे झाशिवाली ॥ धृ० ॥

तांबेकुलवीरश्री ती
नेवाळकरांची कीर्ती,
हिंदभूध्वजा जणु जळती,
मर्दानी राणी लक्ष्मीबाई मूर्त महाकाली !

घोडयावर खंदया स्वार,
हातात नंगि तर्वार,
खणखणा करित ती वार
गोऱ्यांची कोंडी फोडित, पाडित वीर इथे आली.

कडकडा कडाडे बिजली,
शत्रुची लष्करे थिजली,
मग कीर्तिरूप ती उरली,
ती हिंदभूमिच्या पराक्रमाची इतिश्रीच झाली !

मिळतील इथे शाहीर,
लववितील माना वीर,
तरु, झरे ढाळितिल नीर,
ह्या दगडां फुटतिल जिभा, कथाया कथा सकळ काळी !



गोऱ्यांची – गोऱ्या लोकांची, इंग्रजांची.

**अभ्यास :**

१. झाशीची राणी 'कीर्तिरूप उरली' असे का म्हटले आहे?
२. रणांगणावरील तिच्या पराक्रमाचे वर्णन करणाऱ्या ओळी शोधा.
३. 'हिंदभूध्वजा जणु जळती' यासारख्या तुम्हांला आणखी कोणत्या कल्पना या कवितेत आढळतात?
४. वाक्यांत उपयोग करा :
अश्रू ढाळणे, ज्योत मावळणे, कोंडी फोडणे, इतिश्री होणे, जिभा फुटणे.



## ९.

# गुंजारव

### भ. श्री. पंडित

**प्रा. भ. श्री. पंडित** (जन्म : १९०६.) हे नागपूर विद्यापीठात मराठी विभागाचे प्रमुख होते. 'पिचलेला पावा', 'सुवास आणि रस' इत्यादी त्यांचे काव्यसंग्रह प्रसिद्ध आहेत.

या कवितेत स्वतः मधमाशाच बोलत आहेत. त्या काय सांगतात हे पाहा.

फुलाफुलांतून दलादलांतून
प्रत्येक क्षण वेचित मधुकण
आम्ही वन वन करितो वणवण
सहकाराने श्रमविभाजने
करितो साऱ्या समान कार्या.
आम्ही संगी वसतो संधी
राज्य आमुचे मोहळ साचे
मधुचा संचय करितो अक्षय.
मेणाचे थर रचितो सुंदर
सेवातत्पर आम्ही नागर.
करी कुणी जर चाल अम्हांवर
तर मग आम्ही लाहीलाही—

होऊन उठतो		धावत सुटतो
त्यासी डसतो		आणि शासतो.
'जाय अकारण		एकहि न क्षण,
अविश्रांत श्रम		अविरत उद्यम,
यांविण जीवन		म्हणजे जीव न–'
करिता गुणगुण		आम्ही अनुदिन
करिता गुणगुण		करितो नर्तन,
करिता नर्तन		करितो गुणगुण.



श्रमजीवी – कष्ट करून जगणाऱ्या, दल – पाकळी, मधुकण – मधाचे थेंब, संग – मित्रत्व, विभाजन – विभागणी, अक्षय – सतत, शासतो – शिक्षा करतो, अविरत – अखंडपणे, उसंत न घेता.

**अभ्यास :**

१. मधमाशांच्या जीवनातील कोणती वैशिष्टये या कवितेत सांगितली आहेत?
२. मधमाशांच्या गुंजारवातून कोणता संदेश कवीने दिला आहे?
३. 'यांविण जीवन म्हणजे जीव न–' या ओळीतील कल्पना स्पष्ट करा.
४. 'गुणगुण' या शब्दाच्या केवळ नादाने त्याच्या अर्थाची कल्पना येते—असे नाददर्शक शब्द सांगा.

.१०.

# सदैव सैनिका पुढेच जायचे !

## वसंत बापट

**वसंत बापट** (जन्म : १९२२.) हे मुंबई येथे मराठीचे प्राध्यापक आहेत. 'बिजली', 'सेतू' आणि 'अकरावी दिशा' हे त्यांचे कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत.

पुढे दिलेली त्यांची कविता वाचा. हे एक सांघिक गीत आहे. कोणत्याही मोहाला बळी न पडता व संकटांनी खचून न जाता, हिंमतीने आपले ध्येय साध्य करावे, हा संदेश या गीतात दिला आहे.

सदैव सैनिका पुढेच जायचे
न मागुती तुवा कधी फिरायचे
सदा तुझ्यापुढे उभी असे निशा
सदैव काजळी दिसायच्या दिशा
मधून मेघ हे नभास ग्रासती
मधेच या विजा भयाण हासती
दहा दिशांतुनी तुफान व्हायचे
सदैव सैनिका पुढेच जायचे
प्रलोभने तुला न लोभ दाविती
न मोह–बंधने पदांस बांधिती
विरोध क्रोध वा तुला न थांबवी
न मोह भासतो गजान्तवैभवी
न दैन्यही तुझे कधी सरायचे
सदैव सैनिका पुढेच जायचे
वसंत वा शरद तुला न ती क्षिती
नभात सूर्य वा असो निशापती !



विशीर्ण वस्त्र हो विदीर्ण पावले
तरी न पाय हे कधी विसावले !
न लोचना तुवा सुखे मिटायचे
सदैव सैनिका पुढेच जायचे
नभात सैनिका प्रभात येउ दे
खगांसवे जगा सुखांत गाउ दे
फुलाफुलावरी सुवर्ण शोभु दे
जगास शांतता सुहास्य लाभु दे
न पाय तोवरी तुझे ठरायचे
सदैव सैनिका पुढेच जायचे



प्रलोभने – आकर्षणे, गजान्तवैभव – हत्ती बाळगण्याइतकी श्रीमंती, निशापती – चंद्र, विशीर्ण – विरलेले, विदीर्ण पावले – चाळण झालेली पावले.



**अभ्यास :**

१. आपले ध्येय गाठण्यासाठी सैनिकांना कोणकोणत्या गोष्टींना तोंड दयावे लागते?
२. सैनिकाला विसावा न घेता अखंडपणे वाटचाल करावी लागते या अर्थाच्या ओळी कोणकोणत्या आहेत ?
३. कोणते ध्येय साध्य होईपर्यंत सैनिकाला पुढे जायचे आहे ?
४. समान अर्थाचे प्रत्येकी दोन शब्द द्या :
सूर्य, चंद्र, खग, लोचन.
५. खालील ओळींतील कल्पना तुमच्या शब्दांत लिहा :
(अ) मधेच या विजा भयाण हासती.
(आ) फुलाफुलावरी सुवर्ण शोभु दे.



.११.

# पाणी पडते

लोकगीते ही पिढ्यान्‌पिढ्या चालत आलेली असतात. त्यांत लोकजीवनाचे प्रतिबिंब उमटलेले दिसते. ती बोलभाषेत रचलेली असतात. त्यामुळे त्यांत प्रादेशिक जीवनाची व भाषेची वैशिष्ट्ये प्रकट होतात.

पुढे दिलेले हे एक वऱ्हाडी लोकगीत-आहे.

पाणी वरून पडते — जमिनी गेल्या धागा
पोवळे पेरू लागा

पाणी वरून पडते — जमीन शिणारते
मोती हिरे उणारते !

पाणी वरून पडते — पडते उभ्या धारा
तिफणी आल्या घरा

पाणी वरून पडते — टपकते थेंब थेंब
करे झाडं–झुडं चिंब

पाणी वरून पडते — लहरा मारे मुंग
झोंबे पानोपानी शेंग !

पाणी वरून पडते
बाजरा निसवला
दाणा चिकावर आला !

पाणी वरून पडते
तूर बारावर आली
वाकल्या फांद्या खाली

पाणी वरून पडते
डोळे धांडा उसावणी
कांदे जसा नाग फणी !

पाणी वरून पडते
धरे मिरची फुलोरा
भरारला मोतीचुरा !

पाणी वरून पडते
नार चालली वावरा
हाती तिच्या विळा दोरा !

पाणी वरून पडते
कसा मोत्यांचा शिरवा
बाग हिरवा हिरवा !

पाणी वरून पडते
काय पाहता वावरा
धरा धडाल डवरा !

पाणी वरून पडते
बसे दडून हरणी
झाली मुकी मैनाराणी

पाणी वरून पडते
पाहा म्हशी डोबोडोबी
गवळी उभा लोभी !

पाणी वरून पडते
नदी दोथडी भरून
धार चालली फुट्टन

पाणी वरून पडते
मोत्यांचा झाराझुरा
जाते पाणी देवघरा !



धागा – भेगा, लहरा – डोलू लागणे, मुंग – मूग, चिकावर आला – पूर्ण तयार झाला, धांडा – ज्वारीचे ताट, बार – बहर, मोतीचुरा – ज्वारीचा एक प्रकार, धडाल – खुशाल, डवरा – शेतीचे अवजार, डोबोडोबी – डबक्याडबक्यांतून, शेव–लुगड्याचा पदर.

**अभ्यास :**

१. पावसाचे वर्णन करताना मोत्यांचा शिरवा असे एके ठिकाणी म्हटले आहे. असेच पावसाचे वर्णन करणारे कोणते शब्दसमूह या कवितेत आढळतात?

२. पाऊस पडल्यावर जमिनीत कोणते बदल होतात?

३. कोणकोणत्या पिकांचा उल्लेख या कवितेत आढळतो? त्यांचे वर्णन करणारे शब्द शोधा.

४. या कवितेतील कोणत्या ओळी तुम्हांला विशेष आवडल्या? का?

५. आणखी काही लोकगीते मिळवा.





## .१२.

# राजहंस

### रघुनाथपंडित

**रघुनाथपंडित** हे सतराव्या शतकातील एक कवी होत. त्यांनी 'दमयंतीस्वयंवर' हे कथाकाव्य लिहिले आहे. त्यांची वर्णनशैली मनोवेधक असून निरीक्षण सूक्ष्म आहे.

सवे सेना भूपाळ निघालाहे ।
शीव लंघी उदयान एक पाहे ॥
रिघे तेथे मित सेवकांसि बाहे ।
फौज सारी बाहेर उभी राहे ॥ १ ॥

तया वनी एक तटाक तोये ।
तुडुंबले; तामरसानपाये ॥
निरंतरामंद मरंद वाहे ।
तपातही यास्तव रिक्त नोहे ॥ २ ॥

तया सरोवरि राजहंस पाहे ।
राजहंसाचा कळप पोहताहे ॥
तयासाठी हे वापिकाच पोहे ।
नळे केली हे कोण म्हणे नोहे ॥ ३ ॥

त्यातील एक कलहंस तटी निजेला ।
जो भागला जलविहार विशेष केला ॥
पोटीच एक पद, लांबविला दुजा तो ।
पक्षी तनू लपवि भूप तया पहातो ॥ ४ ॥
टाकी उपानह पदे अति-मंद ठेवी ।
केली विजार वरि डौरहि मौन सेवी ॥
हस्ती करी वलय उंच अशा उपायी ।
भूपे हळूच धरिला कलहंस पायी ॥ ५ ॥
कलकल कल-हंसे फार केला सुटाया ।
फडफड निज-पक्षी दाविले की उडाया ॥
नृपतिस मणि-बंधी टोचिता होय चंचू ।
धरि सुदृढ जया तो काय सोडील पंचू ॥ ६ ॥
तदितर खग भेणे वेगळाले पळाले ।
उपवन-जल-केली जे कराया मिळाले ॥
स्व-जन गवसला जो त्याजपाशी नसे तो ।
कठिण समय येता कोण कामास येतो ॥ ७ ॥

सवे – बरोबर, रिघे – शिरे, मित – मोजके, बाहे – बोलावतो, तटाक – तळे, तोय – पाणी, तामरसानपाये – अखंड फुलणाऱ्या कमलपुष्पामुळे, मरंद – फुलातील रस, तप – ऊन, वापिका – विहीर, निरंतरामंद – निरंतर + आमंद = सतत, भरपूर, डौर – झगा, अंगरखा, वलय – कडे, मणि-बंध – मनगट, चंचू – चोच, पंचू – पक्षी, तदितर – इतर, जल-केली – जल-क्रीडा.

**अभ्यास :**

१. तळ्याकाठी विश्रांती घेत असलेल्या हंसाचे वर्णन कसे केले आहे?
२. नळराजाने हंसाला धरल्यावर हंसाने काय केले?
३. त्या वेळी इतर हंसांनी काय केले? का?
४. या कवितेतील प्रसंगाचे तुमच्या शब्दांत वर्णन करा.

## .१३.

# अभंगवाणी

संतकवींची अभंगवाणी पिढ्यान्‌पिढ्या आपण जतन करून ठेवली आहे. खेड्यापाड्यांतून अभंग आजही ऐकायला मिळतात. नित्य नवा प्रकाश देण्याचे सामर्थ्य या अभंगवाणीत आहे आणि म्हणून ती अमर आहे. नामदेव, सावतामाळी, चोखा मेळा, तुकाराम आणि निळोबा या संतकवींचे अभंग पुढे दिले आहेत.

धन्य इंद्रायणी पिंपळाचा पार ।
धन्य ज्ञानेश्वर पुण्यभूमी ।। १ ।।
धन्य भागिरथी मनकर्णिका वोघा ।
आणिक हो गंगा त्रिवेणी त्या ।। २ ।।
धन्य ऋषीश्वर धन्य पांडुरंग ।
मिळाले ते सांग अलंकापुरी ।। ३ ।।
नामा म्हणे धन्य भाग्याचे हे संत ।
झाला पहा एकांत ज्ञानोबाचा ।। ४ ।।

—नामदेव

आमुची माळियाची जात । शेत लावू बागाईत ।। १ ।।
आम्हां हाती मोट नाडा । पाणी जाते फुलझाडा ।। २ ।।
शांति शेवंती फुलली । प्रेम जाई जुई व्याली ।। ३ ।।
सावताने केला मळा । विठ्ठल देखियला डोळा ।। ४ ।।

—सावता माळी

सुखाची सुखराशी आम्हांसी वोळली । ती गाय देखिली पंढरीये ।। १ ।।
ज्ञानदेवा फावली नामदेवा लाधली । प्रेमे पान्हा घाली भाविकांसी ।। २ ।।
गोरा आणि सावता परिसा भागवत । वासुरे पाजित आवडीने ।। ३ ।।
चोखा म्हणे गाय ती पंढरीये आहे । एका वेळा पाहे अरे जना ।। ४ ।।

—चोखामेळा



निंबाचिया झाडा साकरेचे आळे ।
आपुली ती फळे न संडीच ॥ १ ॥
तैसे अधमाचे अमंगल चित्त ।
वमन ते हित करूनि सांडी ॥ २ ॥
परिसाचे अंगी लाविले खापर ।
पालट अंतर नेघे त्याचे ॥ ३ ॥
तुका म्हणे वेळू चंदनासंगती ।
काय ते असती जवळिके ॥ ४ ॥

—तुकाराम

नीच कामी न धरी लाज । भक्तकाज कैवारी ॥ १ ॥
सेवकांचा हा शिरोमणी । म्हणवी करूनि दास्यत्व ॥ २ ॥
उगाळी गंधे पुरवी माळा । वाहे जळा मस्तकी ॥ ३ ॥
निळा म्हणे होउनी वाणी । आणि गोणी भक्तांघरी ॥ ४ ॥

—निळोबा



अभ्यास :

१. नामदेवांनी कुणाकुणाचे वर्णन केले आहे?

२. 'विठ्ठल देखियेला डोळा' म्हणजे विठ्ठलाचे दर्शन झाले. संत सावता माळी यांना विठ्ठलाचे दर्शन केव्हा झाले?

३. तिसऱ्या अभंगात कोणकोणत्या संतांची नावे आली आहेत?

४. तुकारामाने कुणाचे वर्णन केले आहे? त्याची तुलना त्यांनी कुणाकुणाशी केली आहे?

५. भक्तांसाठी परमेश्वर कोणकोणत्या गोष्टी करतो, असे निळोबांनी म्हटले आहे?

